सामाजिक नाटक

# नटीचा बंगला

लेखक

विनायक देवरुखकर

मूल्य १॥ रुपया

— प्रकाशक —
वा. ग. मेहेंदळे
'मानव्य प्रकाशन'
टिळक रोड, पुणें २.

आवृत्ति पहिली
ऑगस्ट, १९५५

या नाटकाचे रंगभूमीवरील प्रयोगाचे हक्क 'सरस्वती-मंदिर नट-संघ' पुणें; या संस्थेकडे दि. ७।७।५५ ते ६।७।५८ अखेर दिले आहेत.

सस्थेचा पत्ता—अध्यक्ष, 'सरस्वती मंदिर नट-संघ,'
१५१ नारायण पेठ, पुणें २.



— मुद्रक —
सर्जेराव गुलाबराव घोरपडे
'विश्वास मुद्रणालय'
४३८। अ. सदाशिव, टिळक रोड,
पुणें २.

आपल्या प्रभावी लेखणीनें

ज्यानीं मराठेशाही

कादंबरी वाङमयांत

अजरामर केली त्या--

**कै. नाथ माधव**

यांच्या स्मृतीस

**—विनायक देवरुखकर**

"**नटीचा बंगला**" या नाटकाचा पहिला प्रयोग-सरस्वती मंदिर नट संघ पुणें;' या संस्थेतर्फे गुरुवार दि. ७–७–५५ रोजीं भानुविलास थिएटर पुणें येथें करण्यांत आला.

नाटकांतील दिवाणखान्याचा फ्लॅट व रंगभूमीवरील सजावट **श्री. के. वि. लिमये**, मंडपवाले यांनीं केली होती.

## – भू मि का –

| | |
|---|---|
| कल्याणी | – उषा अत्रे |
| बकुळा | – कुसुम मांजरेकर |
| बापूसाहेब | – बाळकोबा गोखले |
| सदानंद | – आनंद कुलकर्णी |
| धोंडीराम | – वसंत शिंदे |
| एस्. विश्वनाथ | – चंद्रकांत गोखले |
| कुलंगडी | – माधव दाते |
| संगीत योजना | – संगीतालंकार श्री. बबनराव कुलकर्णी |
| ऑर्गन | – हिंदगंधर्व श्री. शिवरामबुवा दिवेकर |
| तबला | – श्री. न. भ. विक्षीत |
| फिडल | – श्री. बी. आर्. द्रविड |
| प्रकाश योजना | – श्री. र. ह. थत्ते |
| रंगभूषा | – श्री. कृ. ग. ओगले |
| वेषभूषा | – श्री. डी. एन्. सदरे |

# नटीचा बंगला

## अंक पहिला

(स्थळ- आधुनिक पद्धतीनें शृंगारलेला दिवाणखाना. फ्लॅटला मागच्या बाजूला जिना. तिथें खिडकी आहे. तिच्यांतून पलीकडील बाग दिसते. भिंतीवर एक वृद्ध पुरुषाचा व स्त्रीचा फोटो टांगलेला आहे. सिनेमा नटी कल्याणीचे हे मातापिता आहेत. फ्लॅटवर सोफासेट, फ्लॉवर पॉट स्टॅण्डस्, टीपॉयवर सिनेमाविषयक मासिकें, साप्ताहिकें, व वर्तमानपत्रें आहेत. जमिनी-वर चांगला गालिचा पसरलेला आहे.

पडदा वर जातो त्यावेळीं सेटवरचे दिवे लागलेले असतात. पुढील भूपाळी चालूं असतांना हळूहळू सेटवरचे दिवे मालविले जातात आणि हळूहळू फूट लाईट, साईड लाईट आणि हेड लाईटस् लागतात. रंगभूमीवर संपूर्ण प्रकाश होतो. नुकतीच सकाळ झाली आहे अशी कल्पना. भूपाळी पडद्याचे आंतून ऐकूं येते. )

## भूपाळी

ऊठ राजसा तुला उठविते यशोदा माऊली ।
पूर्व दिशेला रंग पसरला रात्र सरुनि गेली ।।
रवि किरणांचा सुवर्ण शेला पांघरून धरणी ।
दाखविते सृष्टीची शोभा जणुं दीपक तरणी ।।
मधुर निनादें गात कोकिळा आम्रतरूवरती ।
उत्साही वातावरणीं ये सत्कार्या भरती ।।
ऊठ श्रीधरा तुझ्या दर्शना व्रज ललना येती ।
निद्रावश तुज पाहुनि हिंपुटि होउनियां जाती ।।

( रंगभूमीवर आचारी धोंडीराम तोंडावर वर्तमानपत्र घेऊन सोफ्यावर पडलेला असतो. फर्निचर पुशीत पुशीत बकुळा मोलकरीण धोंडीरामजवळ येते. )

बकुळा–अहो आचारी–अहो आचारी–

धोंडीराम–(खडबडून उठतो, आळस देतो)

बकुळा–अहो आचारी––

धोंडीराम–कोण आचारी–काय आचारी–कसला आचारी ! कुणाला आचारी म्हणतेस ?

बकुळा–तुमास्नी ! तुमी आचारी न्हाई का ?

धोंडीराम–नो ! नो ! आय अॅम नॉट आचारी ! ( मान वेळवीत, झुल काढून) मी आचारी नाय ! (रुबाबांत) आय अॅम ए कुक !

बकुळा–मंग काय हो, हतं ताईसाबांचा सैपाक कोन करतं ? त्येस्नी न्याहारीला कोन देतं ?

धोंडीराम–नो ! नो ! न्याहारी नो ! नाष्टा म्हण. ब्रेकफास्ट म्हण ! बकुळा, तूं अगदींच खेडवळ आहेस बुवा ! अग, नटीच्या बंगल्यांत काम करायचं तर इतकं अडाणी राहून चालणार नाहीं ! इथं कसं टिपटॉप राहिलं पाहिजे. अग, मालकिणीला मोलकरीण शोभली पाहिजे !

बकुळा–त्ये न्हाई मला कळत ! बरं का–

धोंडीराम–आचारी म्हणूं नकोस ! तुला हजारदां सांगितलं कीं आचारी म्हटलेलं मला आवडत नाहीं. हां ! मी इथं स्वैपाक करतो. पण विटलेली धाबळी नेसून, अगडबंब देहाच्या कानावर विडीचं थोटूक ठेवून मणभर लाकडाच्या चुलखंडावर हंडाभर आमटी ढवळीत बसत नाहीं मी ! तर असा हा कडक इस्त्रीचा ड्रेस घालून,सिगारेटचे झुरके मारीत, स्टेनलेस-स्टीलच्या नाजुक भांड्यांतून सुप्रसिद्ध सिनेस्टार कल्याणी देवींना टेबलावर जेवायला वाढतों.

बकुळा–आवं पन ती चूल पेटली न्हाई अजून !

धोंडीराम–पुन्हां आचारी म्हणूं नकोस माय मदर ! बकुळे, माझ्या आईबापांनीं माझं बारसं करून माझं नांव धोंडीराम ठेवलंय् ! तेव्हां मला धोंडीराम म्हण, धोंडीबा म्हण, वाटल्यास धोंड्या म्हण ! पण आचारी म्हणूं नकोस; नाहींतर तूं आपली मला साहेबच म्हण. सिनेमांतल्या नटांचीं नांवं किती छान असतात ! अशोक कुमार, दिलीप कुमार ! राजकपूर ! चंद्र-कांत–सूर्यकांत ! अहाहा ! नांव उच्चारलं कीं जिभेवर कसं शंकरपाळं विरघळल्यागत वाटतं ! नाहीं तर–

बकुळा–तुमचं नांव ! धोंडीराम ! पन तुमी तरी आतां काय करनार ? एकदां बारसं झालं त्ये झालं. पुन्हां व्हईल का ?

धोंडीराम–अग, पुन्हां बारसं व्हावं म्हणून तर धडपडतोय मी !

बकुळा–अत्ता ग बया ! त्ये कसं व्हनार ?

धोंडीराम–मला एकदां सिनेमांत चान्स मिळूं दे. चटकन् माझं नांव बदलेल आणि या धोंडीरामाचा एकादा कपूर नाहींतर कुमार होईल ! पण अजून मला चान्सच मिळत नाहीं. निदान नटीचा तरी वशिला लागावा म्हणून या नटीच्या बंगल्यांत मी नोकरी धरलीय् !

बकुळा–त्यो वशिला लागंल तवा लागंल ! आदुगर त्येंच्या चाची तयारी करा. बरं का सायेब !

**धोंडीराम**–चहा करायला कितीसा उशीर! दोन मिनिटांत चहा तयार! दाबलं बटन कीं पेटली शेगडी! त्यांची अंघोळ होईपर्यंत सगळा स्वैपाक करीन मी! बाकी मौज आहे हं! मागं मी एकदोन नटयांकडं स्वैपाकाला होतों. त्या बया सकाळची उन्हं अंगावर पडलीं म्हणजे उठायच्या! आणि अंथरुणावर पडल्या पडल्या बेड टी घ्यायच्या! अगदीं पारोशा तोंडानं–नुसती चूळसुद्धां न भरतां! शी! पण आपल्या ताईसाहेबांचं तसं नाहीं. स्नान करून पूजाअर्चा झाल्याशिवाय त्या चहा घेत नाहींत.

**बकुळा**–देवाधर्माला जपत्यात त्या; म्हनून तर हतं लक्ष्मी नांदतीया! बरं कां सायेब, सिनेमा नटीच्या बंगल्यांत काम करायचं म्हणून पहिल्यांदा माज्याबी जिवाला अवघड वाटलं. पन आपल्या ताईसाब लई चांगल्या हैत! या बया! काय मी येडयावानी बोलत बसले! हतलं काम आटपून लौकर घरीं जायचंय मला! ताईसाबांची आंगोळ बी झाली असंल. (देवघरांतील घंटेचा आवाज येतो)

**धोंडीराम**–चला. ताईसाहेब स्नान करून देवघरांत देवपूजेला गेल्या वाटतं. चहाचं आधण टाकावं (जातो).

(बकुळा साफसफाई करीत असतांना सदानंद वर्तमानपत्रें व कोट घेऊन येतो)

**सदानंद**–बकुळा, ताईसाहेबांचं स्नान आटोपलं कां ग?

**बकुळा**–जी व्हय! आतांच आटपलंया जनू!

**सदानंद**–अगदीं वेळेवर आलों तर. (वर्तमानपत्रें टेबलावर ठेवून कोट घेऊन जातो)

**धोंडीराम**–(प्रवेशून सिनेमा मासिकांतला फोटो पहात) असा माझा फोटो छापून आला तर काय बहार होईल! बकुळा, डायरेक्टर एस्. विश्वनाथ एक नवीन चित्रपट काढणार आहेत. त्यांत आपल्या कल्याणीदेवीला काम मिळणार आहे.

**बकुळा**–तुमास्नी ह्यो कसं कळलं ?

**धोंडीराम**–कसं कळलं ? अग आमच्यासारखं सिनेमाप्रेमी लोक सिनेमानटीच्या हालचालीवर कावळ्यासारखे टपलेले असतात. नटी केव्हां झोपते, कशी झोपते, आणि केव्हां उठते ! ती कोणत्या हॉटेलांत जाते, काय खाते आणि काय पिते ! ती कुणाबरोबर फिरते केव्हां फिरते आणि कशी फिरते ! तिला कोणत्या रंगाचं पातळ आवडतं आणि कोणतं जनावर आवडतं, ती किती वेगानं मोटार चालविते ! ती केस कशी वळवते डोळे कशी फिरवते–भुवया कशी उडवते वगैरे वगैरे !

**बकुळा**–(आश्चर्यानें) अग बया, बया, बया ! इकतं तुमास्नी समजतं !

**धोंडीराम**–हाँऽऽ ! नटींचीं हालचाल आम्हाला समजली नाहीं तर आम्ही सिनेमा शोकीन कसले ! बरं बकुळे, मला सिनेमांत काम मिळावं म्हणून तूं सांगशील ताईसाहेबांना ?

**बकुळा**–बोलून चालून मोलकरीन मी ! माजं त्या कसं ऐकत्याल ?

**धोंडीराम**–कसं ऐकश्याऊ ! अग मोलकरणीनं खटपट केली तर मालकीण लटपटायला वेळ लागत नाहीं. इतकी मोलकरणीच्या शब्दाला किंमत आहे. समजलीस ! तूं हिंमत धर जरा.

**बकुळा**–त्ये न्हाई मला जमायचं ! तुमीच इचारा.

**धोंडीराम**–बकुळे, बकुळे, माझ्या महत्त्वाकांक्षेची अशी खारी बिस्किटं भाजूं नकोस ग !

**बकुळा**–तुमचं चऱ्हाट ऐकत बसायला येळ न्हाई मला. माजं कारभारी आजारी हैत. त्येस्नी डागदरला दावायचंय् ! ताईसाबांची कांबरूनंबी आवरायची हैत ! (जाते)

**धोंडीराम**–(खांदे उडवून) अजब नमुना आहे. अच्छा ! मी स्वतःच प्रयत्न करीन. (सदानंद वर्तमानपत्र 'स्क्रीन' पहात प्रवेशतो) ए सद्या, काय वाचतोस रे ? बघूं मला; ( वर्तमानपत्र हिसकावून घेतो. वाचीत)

वा ! वा ! वा ! शीला रामाणी काय म्हणते ? या स्नोमुळं माझी त्वचा तुकतुकीत होते. अरेच्चा ! नरगीसही कांहीं तरी म्हणतेच आहे कीं ! या गिरणीच्या कापडानं माझं सौंदर्य खुलून दिसतं ! ही कसली जाहिरात ? रबरी..शी! शी ! शी ! पुढं बघूं ? हा पाक कसला ? छे ! छे ! अगदींच घाणेरडा पाक दिसतोय ! काय रे सद्या, या एवढ्या जाहिराती छापल्या आहेत यांत बातमी कुठंच दिसत नाहीं ! बघ, तुला तरी बातमी दिसते का? कीं दुर्बीण देऊं बघायला ?अं ऽऽ (फोनची घंटा बाजते) सद्या, बघ कुणाचा फोन आलाय्.

**सदानंद**– ( फोन घेऊन ) हॅलो, कोण बोलतंय् ? चिमणलाल ! काय ?..थोड्या वेळानं भेटतील ताईसाहेब. पुन्हां फोन करा. (फोन ठेवतो)

**धोंडीराम**–सद्या, सिगारेट ओढतोस कारे ?

**सदानंद**–नाहीं.

**धोंडीराम**–तूं कुठला सिगारेट ओढायला ? बिड्या फुकत असशील.

**सदानंद**–बिडीसुद्धां ओढत नाहीं मी !

**धोंडीराम**–बिडी ओढत नाहीं, सिगारेट ओढत नाहीं ! मग जन्माला येऊन करतोस काय तूं ? कीं चोरूनमारून पितोस ?

**सदानंद**–छे ! छे ! कसलंही व्यसन नाहीं मला.

**धोंडीराम**–व्यसन नाहीं ! सद्या, लेका नटीच्या बंगल्यांत नोकरी करतोस तूं ? मला व्यसन नाहीं म्हणून कशाला घमेंड मारतोस ? कुणी विश्वास ठेवील का तुझ्या बोलण्यावर ? शिवाय तुझ्या वागणुकीबद्दल मला डाऊट आहे.

**सदानंद**–डाऊट !

**धोंडीराम**–हो ! हो ! डाऊट ! संशय.

**सदानंद**–तो कसला रे ?

**धोंडीराम**–कल्याणी देवीनीं तुला या बंगल्यांत रहायला खोली दिलीय् !

सदानंद–बरं मग ?

धोंडीराम–तुझ्या खोलींत ने कीं मला चहा प्यायला.

सदानंद–अं हं ! तें नाहीं जमायचं.

धोंडीराम–पाहिलंस ! मग माणसाला कां संशय येऊं नये रे ? सद्या, एकटा एकटा काय करीत असतोस रे ?

सदानंद–कांहीं नाहीं. बसतों वाचीत कांहींतरी.

धोंडीराम–मग दार बंद कशाला करून बसतोस ? कीं चोरूनमारून कांहीं भलतंसलतं वाचीत बसतोस ? मला वाटतं तुझं कांहींतरी गुपीत असलं पाहिजे. नाहींतर इतका कडेकोट बंदोबस्त कशाला ? सद्या, लेका, एकादी पोरगीबिरगी आणून लपवून ठेवली आहेस कीं काय ?

सदानंद–(रागानें) धोंडीराम, थट्टेलासुद्धां मर्यादा असते. दुसऱ्याची जास्त चौकशी करूं नये.

धोंडीराम–अँहँ ! राग तर कसा नाकाच्या शेंड्यावर बसलाय ! मग ने कीं मला तुझ्या खोलींत !

सदानंद–तें शक्य नाहीं.

धोंडीराम–आतां कां ? म्हणजे नक्कीच कांहींतरी गफलत असली पाहिजे. अहो राजमान्य राजश्री, तुमच्या खोलींत जी काय भानगड असेल ती कधींतरी जगासमोर आल्याशिवाय रहाणार नाहीं.

सदानंद–ती जर जगासमोर आली तर डोळे दिपतील तुमचे ! (जातो)

धोंडीराम–अँहँ ! म्हणे डोळे दिपतील ! कुंभाराची सून उकिरड्या-वर आल्याशिवाय रहायची नाहीं ! लेकाचा मोठा डायरेक्टरच लागून गेलाय कीं नाहीं. (फोनची घंटा वाजते) हें कोण कडमडलंय ! (फोन घेऊन) हॅलो, कोण आहे ? काय काम आहे ? अं..? ताईसाहेब आज भेटायच्या नाहींत. हो.. मुळीच भेटायच्या नाहींत.. मेहेरबान, सिनेमा-नटाला भेटण्यापेक्षां दुसरे उद्योग करा.. तुम्हीं चारशें मैलांवरून आलांत

त्याला मी काय करूं ? अं..? पुन्हां चारशें मैल परत जा. (फोन ठेवतो) सिनेमानटी याना कोण वाटते कुणाला ठाऊक !

(काका कुलंगडी प्रवेश करतो. दिवाणखान्यांत इकडेतिकडे पहात स्वतःच्या घरांत आल्याप्रमाणें सोफ्यावर बसतो. धोंडीरामचें लक्ष जातें )

**धोंडीराम**–कायहो ? कोण तुम्हीं ? नांव काय तुमचं ? परवानगी शिवाय आंत कसे आलांत ? आणि स्वतःच्या घरांतल्यासारखे काय बसलांत ?

**कुलंगडी**–(शांतपणानें सिगारेट ओढीत) असा माझ्यासमोर ये. नांव काय तुझं ?

**धोंडीराम**–धोंडीराम.

**कुलंगडी**–काय काम करतोस तूं इथं ?

**धोंडीराम**–मी–मी–कुकचं काम करतों.

**कुलंगडी**–म्हणजे तूं आचारी आहेस !

**धोंडीराम**–नो ! आचारी नो ! आय् अॅम ए कुक ! मी स्वैपाक करीत असलों तरी सगळे लोक मला साहेब म्हणतात. तुमचं नांव काय ?

**कुलंगडी**–कुलंगडी

**धोंडीराम**–काय म्हणालांत ? कुलंगडी ! (हंसतो) साहेब, नांव सांगण्यांत तुमची कांहींतरी चूक होतीय् !

**कुलंगडी**–म्हणजे ?

**धोंडीराम**– म्हणजे तुम्हीं आपलं नांव अर्धवट सांगतांहांत. तुम्हीं पलीकडचीं कुलंगडी सांगितलींत. पण अलिकडचीं लफडीं कुठं आहेत ?

**कुलंगडी**–धोंडीराम, कुणासमोर तूं बोलतो आहेस याची तुला कल्पना आहे का ? कॅमेरामन काका कुलंगडी म्हणतात तो मीच !

**धोंडीराम**–काय म्हणतां ? तुम्हीं कॅमेरामन् काका कुलंगडी ! ओः आय अॅम सॉरी–व्हेरी सॉरी ! तुमचं नांव कुठं तरी वाचल्यासारखं वाटतंय् !

**कुलंगडी**–तोच मी काका कुलंगडी ! बरं. बेबी काय करतीय् ?

**धोंडीराम**–बेबी ! साहेब, आमच्या ताईसाहेबांचं नांव कल्याणी-देवी आहे.

**कुलंगडी**–ती तुला कल्याणी असली तरी मी तिला बेबीच म्हणणार ! कारण माझा अधिकारच तसा आहे. तिला मी अंगाखांद्यावर खेळवलीय्. बालनटी होण्याची मी तिला पहिली संधी दिलीय् ! म्हणून ती आज पांढऱ्या पडद्यावर झळकतीय !

**धोंडीराम**–( ओशाळून ) हें मला पाहीत नव्हतं साहेब.

**कुलंगडी**–अजून माझं काय तुला माहीत आहे ! समजेल हळूहळू. बरं, काय करतीय ती ?

**धोंडीराम**–देवपूजा करताहेत !

**कुलंगडी**–असं ! बराच देवाधर्माचा नाद लागलेला दिसतोय ! मी आलोंय म्हणून सांग तिला.

**धोंडीराम**–हो. ( तरा तरा दरवाजापर्यंत जातो, थबकून परततो. ) तसं सांगता येणार नाहीं साहेब. कारण त्या पूजाअर्चा आटोपल्याशिवाय कुणाशीं बोलत नाहींत किंवा बाहेर येत नाहींत.

**कुलंगडी**–अरे वा ! देवपूजेचं बरंच स्तोम माजलेलं दिसतंय !

( बकुळा आंतून, 'सायेब, अवं सायेब.' )

**धोंडीराम**–काय ग ? ( बकुळा प्रवेशून कुलंगडीला पहातांच थबकते ) काय म्हणतेस ?

**बकुळा**–( दबक्या आवाजांत ) बाईंच आमंदी या.

**धोंडीराम**–आलोंच मी. ( बकुळा जाते. )

**कुलंगडी**–( बकुळा गेली तिकडे रोखून पहात शीळ घालून ) धोंडी-राम, ही कोण साहेबा ?

**धोंडीराम**–ही बकुळा ! इथली मोलकरीण !

**कुलंगडी**–ही मोलकरीण आहे ? ( कृत्रिम दु:खानें ) अरेरे ! केवढ

हें दुर्दैव ! हें केवळ तिचंच दुर्दैव नसून सगळ्या सिनेमा सृष्टीचं केवढं दुर्भाग्य आहे ! अरे ! अरे ! अरे !

धोंडीराम–कां हो ? काय झालं साहेब ?

कुलंगडी–( नाटकी आवेशांत ) जिनं सिनेमांत नायिकेचं काम करून चित्रपटसृष्टीला उर्जितावस्था आणून द्यायची, ती या बकुळेसारखी सुंदरी नटीच्या बंगल्यांत फाटक्या पातळाचं धडोतं नेसून मोलकरणीचं काम करतीय ! धोंडीराम, हिच्या नशिबानं कुठं कोलांटी खाल्ली आणि असल्या बंगल्याची मालकीण होण्याऐवजी इथली मोलकरीण झाली ! अशा कितीतरी सुंदर तरुणी भांडीं घाशीत असतील, कारखान्यांतून राबत असतील आणि कुठल्या तरी खोपटांत उपाशी पोटीं तडफडत असतील. आमची कला उच्च दर्जाला न्यायची असेल तर असल्या देखण्या हिरकण्या हुडकून काढल्या पाहिजेत आणि त्यांना सिनेमांत काम दिलं पाहिजेत !

धोंडीराम–तुम्हीं म्हणता तें खरं आहे साहेब. या सिनेमाच्या मालकांना आणि डायरेक्टरांना मुळींच कळत नाहीं असं माझं मत आहे. आतां माझंच उदाहरण घ्या ना. कॅमेरामन काका कुलंगडी, तुमच्या त्या कॅमेऱ्याच्या कांचेंतून पहा एकदां माझ्याकडे. माझी शरीरयष्टी पडद्याला योग्य आहे असं नाहीं का तुम्हाला वाटत ? इंग्रजी चार पांच इयत्तेपर्यंत मी कसातरी शिकलोय् ! माझं वजन एकशेंतीस पौंड आहे. सिनेमा नट व्हावं अशी माझी जबरदस्त महत्त्वाकांक्षा आहे. कुलंगडीसाहेब, सिनेमासृष्टीची सेवा करण्यासाठीं माझा जीव नुसता तडफडतोय ! (सुस्कारून) पण कुणी आम्हाला चान्सच देत नाहीं. (श्वास घेऊन) त्यामुळं भारताच्या चित्रपट-कलेची अपरंपार हानी होत असून, भारताचे सारे रसिक प्रेक्षक माझ्यासारख्या एका उत्तम कलावंताला कायमचे मुकताहेत हें त्या भारतवासीयांचं केवढं दुर्भाग्य ! (श्वास सोडून दमछाक करतो)

कुलंगडी–ही बकुळा सिनेमांत काम करील का ?

धोंडीराम–साहेब, तुमच्यासमोर बकुळा उभी नसून हा धोंडीराम

उभा आहे. मी तुम्हांला माझ्याबद्दल विचारतोय् तर तुम्हीं मला बकुळेबद्दल विचारताय् !

**बकुळा**–(प्रवेशून) सायेब, वाईच आमंदी चला कीं !

**कुलंगडी**–(बकुळेकडे पहात) ठीक आहे. (बकुळा जाते) धोंडीराम, मला एस्. विश्वनाथला भेटायला जायचंय. बेबीचं पोथीपुराण संपेपर्यंत येईन मी परत.

**धोंडीराम**–पण साहेब, माझी विनंति ध्यानांत ठेवा.

**कुलंगडी**–बरं, बर. (जातो)

( धोंडीराम घरांत जातो. कल्याणी प्रवेश करते. )

## गाणें

**कल्याणीः**–

सखये सांग ना मजला। यशोदेचा बाळ लाडका।
कुठें तुला दिसला ग ।। ध्रु.
केव्हांची मी वाट पाहते। काम न मजला घरांत सुचते।
हुरहुर माझ्या मनीं वाटते। शोधुनि ये त्याला ।। १ ।।
मुरलिनाद हा कुठून आला। वृंदावनिं तो असेल बसला।
स्मरते मनांत राधा बाला। याद नसे त्याला ।। २ ।।
हे श्रीकृष्णा भक्त वत्सला। तव चरणांवर देह वाहिला।
विनती तुजला हे गोपाळा। तारीं तूं मजला ।। ३ ।।

**कल्याणी**–(सोफ्यावर बसून वर्तमानपत्रें पहात) बकुळा– (बकुळा येते) धोंडीरामला म्हणावं चहा घेऊन ये. (बकुळा जाते. धोंडीराम ट्रेमधून चहाचें साहित्य घेऊन येतो. कपांत चहा ओतून साखर ढवळीत असतांना तो अदबीनें उभा रहातो. )

**धोंडीराम**–ताईसाहेब, पार्ले ग्ल्यूकोज आणूं, खारी बिस्किटं आणूं कीं मस्का स्लाईस आणूं ?

**कल्याणी**–धोंडोराम, आज माझा उपासाचा दिवस आहे. (बकुळा येऊन कल्याणीच्या मागें उभी रहाते)

**धोंडीराम**–आय् अॅम सॉरी ! व्हेरी सॉरी !

**कल्याणी**–सदानंदाला हांक मार.

**धोंडीराम**–होय ताईसाहेब. (बाजूच्या खोलीच्या दाराजवळ जाऊन) सद्या, ए सद्या–

**कल्याणी**–धोंडीराम, अशी काय हांक मारतोस ? तो नोकर असला म्हणून काय झालं ? माणसानं नेहमीं नीट बोलावं.

**धोंडीराम**–आय अॅम सॉरी, व्हेरी सॉरी ! सदानंद, ए सदानंद ! (सदानंद टपाल घेऊन येतो)

**कल्याणी**–आजचं टपाल काय आहे ?

**सदानंद**–तेंच आणलंय्. (टपाल टीपॉयवर ठेवतो. कल्याणी पत्रें चाळते. )

**धोंडीराम**–ताईसाहेब, काका कुलंगडी आले होते !

**कल्याणी**–(आनंदानें) काका आले होते ?

**धोंडीराम**–होय ताईसाहेब, एस्. विश्वनाथ आपणाला भेटायला येणार आहेत.

**कल्याणी**–हो का ? बरं. सदानंद, माझ्या आंतल्या टेबलावर हें टपाल नेऊन ठेव. (सदानंद जातो, फोनची घंटा वाजते.) धोंडीराम, फोन घे.

**धोंडीराम**–(फोन घेऊन) हॅलो ! कोण आहे....? (फोनच्या तोंडावर हात ठेवून) ताईसाहेब, लोलकचंद शेटजींचा फोन आहे. काय सांगूं त्यांना ?

**कल्याणी**–(तिरस्कारानें) मी घरांत नाहीं म्हणून सांग.

**धोंडीराम**–ठीक आहे, (फोनच्या तोंडावरचा हात काढून) हॅलो, ताईसाहेब घरांत नाहींत. अं..काय ?.. त्या केव्हां येणार तें सांगतां येत नाहीं. (फोन ठेवतो.)



हाच तो नटीच्या बंगल्यांतील दिवाणखाना--
जेथें हें 'नाटक' घडलें.

**कल्याणी**-हें घरांत नेऊन ठेव. (**धोंडीराम चहाचा ट्रे घेऊन जातो,** कल्याणी वर्तमानपत्र वाचूं लागते. बकुळा थोडी पुढं येते)

**बकुळा**-(खालच्या मानेनें) ताईसाब,

**कल्याणी**-(वर्तमानपत्रांत पहात) काय ग ? (ती बोलत नाहींसे पाहून) काय ग बकुळा ?

**बकुळा**-माजं येक काम हाय ?

**कल्याणी**-कसलं ?

**बकुळा**-मला वाईच पैशाची नड हाय धा रुपयं मिळतील का ?

**कल्याणी**-दहा रुपये ? कशाला पाहिजेत ग ?

**बकुळा**-ताईसाब, दोन महिन झालं माजं कारभारी आजारी हैत. थंडीताप येतुया त्यास्नी. लई अशक्तपणा आलाय्. घरगुती औषदं केली पर गुन न्हाई आला.

**कल्याणी**-मग डॉक्टरचं औषध कां नाहीं दिलंस ?

**बकुळा**-कुठुन डागदर आननार मी ? आजपातोर तुमास्नी सांगितलं नव्हतं. पन सांगन्याची येळ आलीया ! माजं कारभारी विमा कंपनींत पट्टे-वाल्याच काम करीत व्हतं तवा माजा संसार अक्षी सोन्यावानी चालला व्हता. म्होरं कंपनीनं मानसं कमी केली तवा त्यांचा रोजगार गेला. दुसरी-कडं कुट काम बी मिळंना. सहा महिन झालं कारभारी घरांत बसून हैत. घरांत माजा म्हातारा सासरा हाय, सासू हाय, माज्या पगारावर समदं चाललया !

**कल्याणी**-हें तूं आधीं कां नाहीं सांगितलंस मला ?

**बकुळा**-कसं सांगू ? गरिबीचं गाऱ्हानं हाय त्ये ! माजा संसार कसा दृष्ट लागन्यासारखा चालला व्हता. पन दैवाला न्हाई बगवलं त्ये सूख ! त्येंच्या आजारानं माजा जीव अक्षी उडून गेलाय बगा ! त्येंचं दुखणं वाढलं तवा डागदरला घरीं आनलं. सुया टोचाया व्होव्यात म्हनून म्हंगाले त्ये !

**कल्याणी**–बरं. दहा रुपये पाहिजेत तुला ?

**बकुळा**–जी व्हय !

**कल्याणी**–माझी पर्स घेऊन ये. ( बकुळा पर्स घेऊन येते. तिला दहाची नोट देत ) हे घे. ( नोट देते )

**बकुळा**–ताईसाब, लई उपकार झाले बगा. महिन्याच्या पगारातनं पैसे वळते करून घ्या.

**कल्याणी**–तुझ्या पगारातनं हे पैसे वळते करून घेऊं म्हणतेस ? दे ती नोट परत. ( नोट परत घेऊन पर्समध्यें ठेवते ) तुला पैसे मिळणार नाहींत.

**बकुळा**–(आश्चर्यानें) म्हंजे ! ताईसाब–

**कल्याणी**–बकुळा, तुझा नवरा आजारी आहे. तुझं त्याच्यावर जिवापलीकडे प्रेम आहे. गरीबीमुळ औषध आणतां येत नाहीं म्हणून तुला पैसे पाहिजेत. दारिद्र्याचं दुःख मला माहीत नाहीं असं का वाटतं तुला ? मी सुद्धां एकेकाळीं उपासांत दिवस काढीत होते. त्या दुर्दैवी दिवसांची आठवण रहावी म्हणून मी आठवड्यांतून एक दिवस उपवास करते. ( गंहिवरून ) बकुळा, माझ्या आजच्या या वैभवाखालीं माझ्या डोळ्यांतून सांडलेला अश्रूंचा महासागर दडलेला आहे याची कुणाला कल्पना तरी आहे का ? तुला दिलेलं पैसे मी जर परत घेतले तर माझी स्वर्गातली आई मला शाप दिल्याशिवाय राहणार नाहीं.

**बकुळा**–ताईसाब, शिरिमंतीमुळं मानसाला गरिबाची याद येत न्हाई ! पन किती झालं तरी मी तुमची मोलकरीन हाय–

**कल्याणी**–पुढं बोलूं नकोस. तूं माझी मोलकरीण आणि मी तुझी मालकीण आहे. पण बकुळा आपण प्रथम माणसं आहोंत. तुझ्या एवढी माझी बहीण हालांत दिवस काढीत असती तर मी तिला दूर लोटली असती ? तिला दिलेले पैसे परत घेतले असते ? अशी मी माणुसकी

सोडली असती ? बकुळा, तुला तुझा नवरा आहे ! तुझा संसार आहे; पण-( गळा दाटून ) पण मला माझं असं कोण आहे या जगांत ? तीन वर्षांपूर्वीं माझी आई गेली, गेल्या वर्षीं माझे बाबा गेले ! मला भाऊ नाहीं,-बहीण नाहीं-माझ्या जिवाभावाचं असं मला कुणी नाहीं-अगदीं एकटी आहे मी-अगदीं एकटी ! ( आवेग आवरून ) हे घे दहा रुपये आणि हे दहा रुपये वर खर्चाला असू देत. ( दहाच्या दोन नोटा देते. )

**बकुळा**-( भरल्या अंतःकरणानें ) ताईसाहेब, लई उपकार हैत तुमचं माज्यावर !

**कल्याणी**-कोण कुणावर उपकार करतंय ! देवानं माणसाला अंतःकरण दिलंय तें नाजूक फुलासारखं फुलवायचं की कठोर दगडासारखं बनवायचं हे माणसाच्या हातांत असतं. बकुळा, तूं आपल्या नवऱ्याच्या प्रकृतीला जप हं !

**बकुळा**-मला डागदरकडं जायचंय ! ततनं लवकर परत यंईन मी.

**कल्याणी**-आज तू नाहीं आलीस तरी चालेल.

**बकुळा**-पण हतलं काम-

**कल्याणी**-त्याची तूं काळजी करूं नकोस. तुझ्या नवऱ्याच्या जिवापेक्षां माझं काम जास्त मोलाचं नाहीं.

**बकुळा** बरं. येते मी ! ( दरवाजाजवळ जाऊन परत येते. ) ताई-साब, माजा संसार तुमी सावरून धरलाय !

**कल्याणी**-( तिच्या पाठीवरून हात फिरवीत ) जा तू. ( बकुळा जाते. तिकडे पहात ) माझा संसार ! बकुळा, तुझा जीव तुझ्या नवऱ्या-साठीं तिळ तिळ तुटतोय ! गरीबींतसुद्धां किती सुखी आहेस तूं ! आणि मी ? कोण आहे मला ? एवढ्या वैभवांतहि माझा जीव दुःखीच आहे. ( मंद पावलें टाकीत आईच्या फोटोजवळ येते. ) आई, माझा संसार-

माझा संसार हे अमृतांत भिजलेले शब्द माझ्या ओठांवर घोळतील का ग ? ( दुःखावेगानें आंत जाते. )

( रंगभूमीवरील क्षणभर शांततेनंतर दारावरील घंटा वाजते. सदानंद प्रवेशून बाहेर जातो. एस्. विश्वनाथ आणि काका कुलंगडी प्रवेश करतात त्यांच्यामागोमाग सदानंद आंत येतो. )

**विश्वनाथ**–( रुबाबांत पाईप ओढीत ) कल्याणीदेवी आहेत ना ?

**कुलंगडी**–डायरेक्टर एस्. विश्वनाथ आलेत म्हणून सांग.

**सदानंद**-सांगतो ताईसाहेबांना बसा आपण. ( आंत जातो. )

कुलंगडी–बैस, डायरेक्टर एस्. विश्वनाथ बैस. ( दोघे बसतात ). हं. काय सांगत होतो मी ? असे मजेंत दिवस काढले. या बाबतींत माझं आपलं सिगारेटचं तत्वज्ञान आहे.

**विश्वनाथ**-( पाईपचा झुरका घेऊन ) सिगारेटचं तत्वज्ञान? तें कसलं बुवा ?

**कुलंगडी**–ही पहा मी सिगारेट पेटवतों. (सिगारेट शिलगावतो) आतां मी हिचे झुरके मारले नाहींत तरी हिची जळून राख होणारच ! म्हणजे पेटलेल्या सिगारेटचे झुरके न मारणं हें जसं मूर्खपणाचं लक्षण आहे तसं जन्माला येऊन मौज न मारणं हें महामूर्खपणाचं लक्षण आहे. म्हणून माणसानं मजा मारली पाहिजे. (हंसतो)

**विश्वनाथ**–म्हणजे लफडीं केलीं पाहिजेत ! बाकी तो तुझा स्वभावच आहे म्हणा ! (हंसून) कुलंगडी हें नांव चांगलंच शोभतंय तुला.

**सदानंद**–(प्रवेशून) ताईसाहेबांनीं बसायला सांगितलय् आपणाला ! त्या जरा कामांत आहेत.

**विश्वनाथ**–ठीक आहे. (सदानंद आपल्या खोलींत जातो)

**कुलंगडी**–विश्वनाथ, तूं आतां जो नवीन चित्रपट काढणार आहेस त्याबद्दल मी तुझं अभिनंदन करतों.

**विश्वनाथ**–थँक्स ! (पाईपचा झुरका घेतो)

**कुलंगडी**–थँक्स काय लेका ? इतका रुबाब करूं नकोस ! आपण दोघे एकाच वेळेला सिनेमा कंपनीत शिरलों. तूं फट्मार्कर म्हणून राहिलास तर मी कॅमेऱ्याची ट्रॉली ओढीत होतों. आतां तूं डायरेक्टर एस्. विश्वनाथ झालास आणि मी कॅमेरामन काका झालों. तुझ्या या नव्या चित्रपटाला माझी फोटोग्राफी पाहिजे. असा मस्त कॅमेरा लॅन करतों–

**विश्वनाथ**–(पाईपचा झुरका घेत) यावर मला विचार केला पाहिजे.

**कुलंगडी**–विचार केला पाहिजे ! हें तूं मला शिकवतोस ? अरे, आपण एकमेकांना उचलून धरलं पाहिजे. तरच आपलं टीमवर्क चांगलं होईल. आपण कर्तबगार माणसं आहोंत. माझंच पहा ना ! ही कल्याणी सातव र्षांची असतांना दोन खणाच्या खोलींत रहात होती. हिचा बाप औषधीच्या कारखान्यांत बाटल्या धुण्याचं काम करीत होता. घरांत दुपारची भ्रान्त होती, म्हणून मी हिला सिनेमांत पहिलं काम मिळवून दिलं. बालनटी बेबी कल्याणी म्हणून तिचं कौतुक झालं. फिल्म फेअरनं तिला पहिलं प्लेअर प्राईज दिलं.

**विश्वनाथ**–बेबी कल्याणीची आतां कल्याणीदेवी झाली अन् या बादशाही बंगल्यांत राहूं लागली. ही झाली तिची कर्तबगारी, आणि तुझी कर्तबगारी काय ? तर तुझा हात अजून ट्रॉलीवरच आहे. नुसतीं लफडीं कुलंगडीं करण्यांत दिवस घालवतो आहेस झालं.

**कुलंगडी**–विशा, असं मला डिवचूं नकोस ! माझ्या कल्याणीची भूमिका म्हणजे बॉक्स हिट आहे. समजलं ?

**विश्वनाथ**–( आठवल्यासारखें करून ) काका, माझ्या या नव्या चित्रपटासाठीं मला एक नवा चेहरा पाहिजे. तुझी नजर बरीच चोखंदळ आहे. आहे का कुणी तुझ्या बघण्यांत ? मुलगी देखणी पाहिजे. तिच्यांत सेक्स अपील पाहिजे.

कुलंगडी–आहे. असा एक नवा चेहरा आहे माझ्या बघण्यांत! पण जरा धीरानं घेतलं पाहिजे.

विश्वनाथ–कुठं आहे ती?

कुलंगडी–याच बंगल्यांत आहे. पण काम जरा गावरान आहे.

विश्वनाथ–गावरान असली म्हणून काय झालं?

कुलंगडी–ही गावरान मिरची तिखट आहे.

विश्वनाथ–असू दे रे तिखट! असली गावरान मिरची मोडायला मला कितीसा वेळ लागणार? अरे, चेहरा नवा असला तरी मी नवा नाहीं. तसल्या प्रसंगाचा मला चांगलाच परिचय आहे. पण हा नवा चेहरा– (धोंडीराम मंडईत जाण्याच्या पिशव्या घेऊन प्रवेशतो)

कुलंगडी–हा बघ–हा बघ नवा चेहरा. याचं नांव धोंडीराम.

विश्वनाथ–असं का? वा! वा! छान!

कुगलंडी–धोंडीराम, हे डायरेक्टर एस्. विश्वनाथ.

धोंडीराम–(आश्चर्यानें) हे डायरेक्टर एस् विश्वनाथ! साहेब मला–

कुलंगडी–सिनेमांत चान्स पाहिजे.

धोंडीराम–(अजीजीनें) होय साहेब.

विश्वनाथ–(कृत्रिमपणें) पाहिलंस कुलंगडी, कळकळीचे कलावंत काळोखांत रहातात. आपण त्यांना–

कुलंगडी–उजेडांत आणलं पाहिजे! पडद्यावर आणलं पाहिजे!

विश्वनाथ–आजकालची दुनिया खऱ्या कलावंताला विचारीत नाहीं. धोंडीराम, आम्हीं तुला जरूर चान्स देऊं.

धोंडीराम–(मोठ्या आनंदानें) काय म्हणतां? तुम्हीं मला चान्स देणार? मी–मी–नट होणार! मी मलाच पडद्यावर पहाणार! अहाहा! बाबा एस्. विश्वनाथा, मायावी जगाच्या विश्वामित्रा-परमेश्वरा! (विश्वनाथाला साष्टांग नमस्कार घालतो)

**विश्वनाथ**–( कुलंगडीकडे पाहून उपहासानें हंसून ) सिनेसृष्टीच्या भावी सम्राटा ऊठ. (धोंडीराम उठतो) सिनेमा नट होण्यासाठीं महान तपश्चर्या करावी लागते. करशील तूं ?

**धोंडीराम**–( मंत्रांनें भारावल्यासारखा ) करीन !

**कुलंगडी**–आमच्या शिकवण्याप्रमाणं शिकलं पाहिजे.

**धोंडीराम**–शिकेन !

**कुलंगडी**–आम्हीं सांगू ती कामगिरी पार पाडली पाहिजे.

**धोंडीराम**–पाडीन !

**कुलंगडी**–आमची कामगिरी–(बकुळा बाहेरून ल्गबगीनें येते व आंत जाते, तिच्याकडे पहात) सांगूं केव्हां तरी–

**धोंडीराम**–पण साहेब, मला एकदां चान्स द्या.

**विश्वनाथ**–तूं माझ्या घरीं येऊन भेट.

**कुलंगडी**–प्रथम तूं माझ्या घरीं ये.

**धोंडीराम**–बरं साहेब. मी तुमच्या घरीं येईन आणि (विश्वनाथास) तुमच्याही घरीं येईन. पण मला आतां मंडईत जायचंय्. (रुबाबांत जातो)

**विश्वनाथ**– (हंसून कुलंगडीस टाळी देऊन) लेकाच्याला सिनेमांत काम करायचंय् !

**कुलंगडी**–विगा, या धोंड्याला सिनेमांत चान्स देऊं आणि आपण हा चान्स घेऊं. (दोघे हंसतात ) कायरे विश्वनाथ, तुझ्या या नव्या चित्रपटासाठीं कोणता बकरा गांठला आहेस ?

**विश्वनाथ**–एक बकरा गांठलाय मी ! जरा म्हातारा आहे तो !

**कुलंगडी**–काय ? तुझा बकरा म्हातारा आहे ?

**विश्वनाथ**–होय. त्याच्या सुताच्या दोन गिरण्या आहेत. भांड्यांचा मोठा कारखाना आहे. चिक्कार पैसा आहे. त्याच्याजवळ पण म्हातारा

मोठा मख्ख ! त्यानं आजपर्यंत कोणत्याही सिनेमा कंपनीला पैसा दिला नाहीं.

कुलंगडी–असल्या मख्ख बकऱ्याला तूं कापलंस कसं ?

विश्वनाथ–हीच तर माझी करामत ! माझ्या नव्या बोलपटाला भांडवल पाहिजे होतं. धाडस करून मी या म्हाताऱ्याला गांठलं. मनांत म्हटलं साधला लग्गा तर साधावा. अगदीं कांटकसरीच्या हिशेबानं सव्वा लाखाचा अजमास दिला पण त्यानं साफ नकार दिलान्. शेवटचा डाव टाकावा म्हणून कल्याणी देवीला मी प्रमुख भूमिका देणार आहें असं म्हणालों. अन् काय ? थेरडा गर्‌कन् फिरला. अरे तिच्यासाठीं दोन लाख रुपये द्यायला कबूल झाला. हा म्हातारा बहुतेक रंगेल असावा !

कुलंगडी–असणारच ! अरे याचा अर्थ असा कीं इथं नक्कीच कांहींतरी भानगड असावी. कायरे, त्या म्हाताऱ्याला ( नाकपुडीवर बोट ठेवून ) असला नाद असला पाहिजे.

विश्वनाथ–अगदीं बरोबर ! ( हलके ) या कल्याणीशीं त्याची कांहीं भानगड असावी. नाहींतर उगाच दोन लाख रुपये ओतायला कोण तयार होईल ?

कुलंगडी–शक्य आहे. नांव कायरे त्याचं ?

विश्वनाथ–बापूसाहेब शहाणे म्हणतात त्याला.

कुलंगडी–अस्सं ! बराच शहाणा दिसतोय हा शहाणा थेरडा.

विश्वनाथ–ही कल्याणी कां नाहीं आली अजून !

कुलंगडी–या नट्या अशाच भाव खातात. ही बेबी मारे देवधर्म करतेय् ! वाटेल तसं वागायचं आणि देवधर्म करायचा. कसा देव प्रसन्न होणार ? ( चाहूल घेऊन ) आलीच बरं का !

(कल्याणी उंची वेलबुट्टीचें पातळ नेसून नटीप्रमाणें वेशभूषा करून प्रवेशते)

**कल्याणी**–(हंसत) नमस्ते.

**विश्वनाथ**–(हंसत) नमस्ते.

**कल्याणी**–जरा थांबावं लागलं तुम्हाला. माफ करा हं. हॅलो काका, तुम्हीं केव्हां आलांत ?

**कुलंगडी**–नुकताच आलों मी. ( तिच्याजवळ जाऊन तिच्या दोन्ही खांद्यांवर हात ठेवून ) बेबी, केवढी मोठी झालीस ग तूं ? तुला बघून तीन चार वर्षं झालीं मला. ( तिला लांबून न्याहाळीत ) गुड ! व्हेरी फाईन ! कल्याणी, तूं फ्रॉक घालीत होतीस तेव्हां तुला मी खांद्यावरनं कंपनींत नेत होतों. पण आतां ( कल्याणी आणि कुलंगडी हंसतात.) बैस, बैस. फार फार मोठी झालीस तरी तूं माझी बेबीच आहेस !

**कल्याणी**–आपल्या येण्याचं कारण ?

**कुलंगडी**–हो. कल्याणी हे डायरेक्टर एस्. विश्वनाथ !

**कल्याणी**–हो का ?

**विश्वनाथ**–मी दमयंती नांवाचं पिक्चर काढणार आहें. त्यांत तुम्हांला दमयंतीची भूमिका देणार आहें.

**कल्याणी**–मला वेळ कुठं आहे ?

**सदानंद**–(प्रवेशून) बाईसाहेब, विशाल पिक्चर्सचा करार आहे यांत आणि दोन कंपन्यांचीं पत्रं आहेत. त्यावर तुमची सही पाहिजे ( फाईल देतो) त्यांत चेक बुक आहे. दोन चेकवर सह्या करावयाच्या आहेत.

**कल्याणी**–(फाईल पाहून ) माझ्या टेबलावर नेऊन ठेव. ( सदानंद फाईल नेऊन ठेवतो व पुन्हां आपल्या खोलींत जातो. ) मला तुमच्या पिक्चरमध्यें काम करायला सवड सांपडेल असं वाटत नाहीं. कारण सध्यां तीन पिक्चर्स चालू आहेत माझीं.

**विश्वनाथ**–तरीपण माझं प्रपोजल तुम्हीं स्वीकारलं पाहिजे. कारण माझी सगळी भिस्त तुमच्यावर आहे.

कुलंगडी–अग, तूं नाहीं म्हणालीस तर आमचा चित्रपटच निघणार नाहीं. काय विश्वनाथ ?

विश्वनाथ–हो. बरोबर आहे.

( फोनची घंटा वाजते, कल्याणी फोन घेते. )

कल्याणी–हॅलो ? कोण आहे ? डायरेक्टर रामचंद्र ! ओहो ! नमस्ते. काय म्हणतां ? सेट तयार आहे ! पण–पण–हें पहा डायरेक्टर, आज मी मूडमधें नाहीं हो. सकाळपासनं माझं डोकं जरा दुखतंय..उद्यां घ्या ना शूटिंग..काय म्हणतां ?..पैसा वायां जाईल हें कळतंय् मला !.. पण मी तरी काय करणार ! प्लीज, उद्यां ठेवा शूटिंग..प्लीऽऽज्.. माझा मूड असता तर आले असते..(फोन ठेवते)

विश्वनाथ–हें पहा कल्याणीदेवी, तुम्हीं काम करीत असाल तरच भांडवल देईन अशी आमच्या फायनान्सरची मुख्य अट आहे. आमचे फायनान्सर बापूसाहेब शहाणे तुम्हांला भेटायला स्वतः येणार आहेत.

कल्याणी–त्यांना कशाला ही तसदी !

कुलंगडी–तसदी कसली त्यांत ? तुझ्यासारख्या प्रख्यात नटीच्या बंगल्याचा उंबरठा भांडवलदारानं झिजवलाच पाहिजे. हा तुझा मान आहे.

विश्वनाथ–आम्ही तुम्हांला जास्त त्रास देणार नाहीं. चार महिन्यांत मोकळं करूं तुम्हांला. काय सांगू कल्याणीदेवी, तुमच्यासाठीं अशी खास दमयंतीची भूमिका तयार केलीय कीं वा ! हा चित्रपट हॉलीवुडमध्यें दाखविण्याचा माझा विचार आहे. भारताच्या कलेचे नगारे अमेरिकेंत वाजले पाहिजेत.

कुलंगडी–या चित्रपटानं तुला जगांत कीर्ति मिळेल. आज तुझे वडील असते तर त्यांना केवढा आनंद झाला असता ( कल्याणीच्या वडिलांच्या फोटोला नमस्कार करतो. )

विश्वनाथ–तुम्हीं आपल्या व्यवहाराचं नक्की सांगा म्हणजे फायना-

न्सरसमोर घासाघीस नको. सांगाल त्या रकमेला एकदम मान्यता मिळेल कारण बापूसाहेब शहाणे फार दिलदार स्वभावाचे आहेत. त्यांना कलावंताची कदर आहे. आदर आहे. फक्त तुमची रक्कम सांगा.

**कल्याणी**–बरं तर. रक्कम सांगूं ?

**विश्वनाथ**–बेलाशक सांगा.

**कल्याणी**–पंचवीस हजार रुपये मिळाले पाहिजेत मला.

**विश्वनाथ**–बस्स ! एवढेंच !

**कल्याणी**–पण माझी एक अट आहे. ती म्हणजे करारांत फक्त पांच हजार लिहावयाचे आणि वीस हजार रुपये करार करण्यापूर्वी द्यावयाचे !

**विश्वनाथ**–ठीक ! ठीक ! म्हणजे तुम्हाला वीस हजार ब्लॅक मनी पाहिजेत. होईल त्याप्रमाणं व्यवस्था.

कुलंगडी–बेबी, बरीच व्यवहारदक्ष झालीस कीं ! बरं. तुझ्या या वरच्या वीस हजारांत आमची भागीदारी–

**कल्याणी**–तशी भागीदारी असेल तर मला हें कॉन्ट्रॅक्ट नको. आपली बैठक संपली म्हणून समजा.

**विश्वनाथ**–अहो पण–अशी गैरसमजूत करून घेऊं नका. काका, तूं कशाला बोललास ? बापूसाहेबांना हें समजलं तर ? कल्याणीदेवी, तुमची सगळी रक्कम तुम्हांला मिळेल. त्यांत कुणाचीहि भागीदारी नाहीं.

**कल्याणी**–तरच मी काम करीन.

**विश्वनाथ**–तुम्हीं भूमिका स्वीकारली हें ऐकून बापूसाहेबांना फार आनंद होईल. माणूस एवढा श्रीमंत पण अगदीं सज्जन ! फारच स्वागतशील आणि प्रेमळ मनाचा !

**सदानंद**–( प्रवेशून ) बाईसाहेब, बाहेर मोटारींतनं बापूसाहेब स्वतः न कुणीतरी आलेत.

**विश्वनाथ**–अरे, हें सांगत काय आलास? त्यांना घेऊनच यायचं कीं नाहीं !

( गडबडीनें बाहेर जाऊन बापूसाहेबांना घेऊन येतो. )

**विश्वनाथ**–यावं, यावं बापूसाहेब. कल्याणीदेवी, हे बापूसाहेब; बापूसाहेब या कल्याणीदेवी.

( बापूसाहेब स्थिर नजरेनें कल्याणीकडे पहातात. ते कसल्यातरी आठवणीनें अस्वस्थ होतात; आवेगानें ते पुढें सरकतात. )

**बापूसाहेब**–कल्याणी–कल्याणी–

( कल्याणी गोंधळून मागें सरते )

**पडदा**



# अंक २ रा

(स्थळ– पहिल्या अंकाप्रमाणेंच दिवाणखाना. सजावट पहिल्या अंकाप्रमाणेंच. पडदा वर जातो त्यावेळीं कल्याणी रंग-भूमीवरील सोफ्यावर वर्तमानपत्र वाचीत बसलेली असते. थोडा वेळ गेल्यावर बापूसाहेब शहाणे दरवाजाजवळ येतात. तिथूनच ते कल्याणीकडे पहातात आणि मंद पावलें टाकीत तिच्याजवळ येतात. तोपर्यंत कल्याणी आपल्या वाचनांत गर्क असते. बोलावें कीं बोलूं नये असा बापूसाहेबांच्या मुद्रेवर भाव असतो. )

**बापूसाहेब**–(भावनावेगानें) कल्याणी देवी–

**कल्याणी**–(चमकून) कोण? (बापूसाहेबांना पाहून चमकून उठते.) अगबाई! आपण!

**बापूसाहेब**–(तिच्याकडे पहात त्याच भावनातिशयानें) मी आलों होतों सहज. या बाजूनं जात होतों मी, मनाला राहवेना म्हणून तुमच्या बंगल्यांत शिरलों. मनांत म्हटलं– मनांत म्हटलं–

**कल्याणी**–(अस्वस्थ होऊन) काय?

**बापूसाहेब**–(तिच्यावरची नजर नाइलाजानें काढून वाचरत) मनांत म्हटलं कीं– तुम्हांला भेटावं, तुम्हांला पहावं– कारण आजचा दिवस– आजचा दिवस–

**कल्याणी**–काय आहे आज ?

**बापूसाहेब**–आज ! हो आजच ! (क्षणभर थांबून) कल्याणी देवी, मी बसूं का थोडा वेळ ?

**कल्याणी**–बसा कीं ! ओळख नसल्याप्रमाणं काय विचारतां तुम्हीं ?

**बापूसाहेब**–ठीक. (बसतात.)

**कल्याणी**–आपलं कांहीं काम असलं तर सांगा मला.

**बापूसाहेब**–माझं काम– माझं काम– कल्याणी देवी– तुम्हीं बसा कीं ! बसा. (कल्याणी बसते. स्वतःशीं पुटपुटल्याप्रमाणें बोलतात) सात वर्षांपूर्वी आणि आज ! त्यावेळीं तें सजीव चित्र आणि आज हें सजीव चित्र !

**कल्याणी**–काय बोलतांहांत तुम्हीं ?

**बापूसाहेब**–(त्याच भावनेंत) जें होतं तें नव्हतं झालं आणि आज ! आज मला असं समाधान मानून घ्यावं लागतंय् ! (एकदम मोठ्यानें) कल्याणी–

**कल्याणी**–काय म्हणालांत ?

**बापूसाहेब**–माझ्यासमोर जरा उभ्या रहाल का ?

**कल्याणी**–(उभी राहून हंसत ) बापूसाहेब, मला वाटतं तुम्हांला कांहींतरी होतंय् !

**बापूसाहेब**–कांहीं होत नाहीं मला. कल्याणीदेवी, देहाचं दुखणं औषधानं बरं करतां येतं. पण मनाचं दुखणं– त्याला लवकर औषध मिळत नाहीं. आणि मग तें तसंच झिजत झिजत जातं.– आणि अखेर. . . तसंच तळमळत त्याला जावं लागतं ! पण कल्याणीदेवी––

**कल्याणी**–काय ?

**बापूसाहेब**–कांहीं नाहीं– कांहीं नाहीं. जातों मी आतां. सहज आलों होतों– जातों मी ! ( निघतांना ) कल्याणीदेवी, जातों मी– जातों मी (अस्वस्थतेनें जातात.)

(बापूसाहेबांच्या या वर्तनानें कल्याणी विस्मयचकित होते. ती दरवाजाजवळ जाते. आंतून बकुळा कल्याणीकडे पहात प्रवेश करते )

**बकुळा**–ताईसाब–

**कल्याणी**–काय ग ?

**बकुळा**–त्ये म्हातारबुवा गेले वाटतं ?

**कल्याणी**–होय. कां ग ?

**बकुळा**–काई न्हाई. त्ये आल्यापासनं मी दाराच्या आंतल्या बाजूला उभी व्हते. म्हनलं ह्यो म्हातारा अवचित कशापाई आलाय् !

**कल्याणी**–म्हणजे ? ते आले म्हणून तुला कांहीं संशय आला ?

**बकुळा**–म्हनलं ह्यो म्हातारा असा बिचकत बिचकत आला अन् तुमच्याशीं बोलतांना बी लई घुटमळत व्हता.

**कल्याणी**–मी दिसलें म्हणजे असेंच ते वागतात. दमयंती चित्रपटाचा मुहूर्त झाला त्यावेळीं ते स्टूडियोंत आले होते त्यावेळींसुद्धां ते असेच वागले. त्यानां कांहींतरी बोलायचं आहे. पण ते तसेच थबकतात. त्यांच्या या वागण्याचा अर्थच कळत नाहीं मला.

**बकुळा**–ताईसाब, कांहीं मानसं वरून अशी देवावानी दिसत्यात, ग्वाड बोलत्यात. पर त्येंचं काळीज मातुर कडू कारल्यावानी असतं. त्यातून ही शिरिमंत मानसं ! त्येंच्या बोलन्याचालन्याचा तर पत्त्याच लागत न्हाई.

**कल्याणी**–आतां बापूसाहेब आले पण मोकळेपणानं बोलले नाहींत. ते फारच तुटक तुटक बोलले. त्यामुळं मला त्यांच्या स्वभावाची कल्पनाच येत नाहीं.

**बकुळा**–त्ये कायबी असलं तरी तुमास्नी काय करायचंय् ? आपलं

लं कीं आपुन भलं असं न्हायलं म्हंजे झालं.

**कल्याणी**–असंच वागते मी. पण या बापूसाहेबांच्या बाबतींत मला निराळंच वाटतंय् !

**बकुळा**–तुमी सिनीमांत काम करणारीं मानसं ! कुनाच्या मनांत कवा काळंबेरं येईल त्येचा नेम न्हाई लागायचा. साप म्हनू न्हाई धाकला अन् बाप म्हनू न्हाई आपला असलं दिवस हैत. त्यो म्हातारा येडचाचं रूप घेत असंल. पर ताईसाब, तुमी मातुर भिऊं नका.

**कल्याणी**–असाच माझ्या मनाला कुणाचातरी आधार पाहिजे. बकुळा, मी नटी आहें, नटीचा बंगला म्हणून लोक माझ्या बंगल्याकडे बोट दाखवून आपापसांत कांहींतरी कुजबुजतात. हा प्रकार पाहून माझं मन कसं धास्तावल्यासारखं झालंय !

**बकुळा**–तुमी कशाला इकतं भिताय् ? कर न्हाई त्येला डर व्होवी कशाला ?

**कल्याणी**–तें सगळं खरं आहे ग ! पण माझ्या मनाची कुणालाच कल्पना नाहीं. मी नटी असले, एवढ्या वैभवांत रहात असले तरी माझ्या अंतःकरणांत कोणत्या भावना तडफडत आहेत याचा कुणी विचारच करीत नाहींत.

**बकुळा**–लोकास्नी त्येचा इचार करन्याचं काय कारन ? दिल्या दामाचीं अन् आपल्या कामाचीं मानसं हैत हीं ! लोक आपला इचार करत न्हाईत तर आपून त्येंचा इचार कशाला करायला व्होवा ?

**कल्याणी**–बकुळे, तूं आपली सरळ मार्गाची आहेस. सिनेमाच्या धंद्यांत मी पुष्कळ बरे-वाईट प्रकार पाहिलेत. परंतु या बापूसाहेबांच्या-सारखा मला पूर्वी कधीं अनुभव आला नव्हता–

**सदानंद**–( प्रवेशून ) म्हणून गैरसमज होतोय तुमचा.

**कल्याणी**–( चमकून ) सदानंद !

सदानंद–बापूसाहेबांच्याबद्दल तुम्हीं बोलत होतां. त्यांतले कांहीं शब्द माझ्या कानावर पडले, म्हणून मी तुमचं सर्व बोलणं ऐकलं. त्यांच्याबद्दल तुमचा कांहींतरी गैरसमज होतोय.

कल्याणी–म्हणजे ? त्यांना ओळखतोस तूं ?

सदानंद–छे ! छे ! एवढा लक्षाधीश माणूस माझ्या ओळखीचा कसा असणार ? ताईसाहेब, पैशाच्या भिंती मधें उभ्या राहिल्या म्हणजे ओळखीचीं माणसं एकमेकांपासून दुरावतात हा जगाचा नियम आहे आणि माझा अनुभव आहे. विस्तवानं हात भाजतो माणसाचा, कारण तो धग-धगीत निखारा असतो. पण बर्फाप्रमाणं थंड असणाऱ्या संपत्तीच्या स्पर्शानं माणसाचं आयुष्य होरपळून निघतं हाही एक जगाचा नियम असतो. (स्वत:ला एकदम आवरून) ताईसाहेब, इतकं मी बोलायला नको होतं.

कल्याणी–म्हणजे माझी कल्पना बरोबर आहे. तूं दिसतोस तसा नाहींस. सदानंद, इथं येण्यापूर्वीं कुठं होतास तूं ? काय करीत होतास ?

सदानंद–आयुष्यांतलं फार चांगलं स्वप्न रंगवीत होतों मी ! त्या स्वप्नामागं धांवत होतों. पण मृगजळामागं धांवून कोरडा पडलेला घसा ओला होत नाहीं याचा अनुभव मिळाला मला.

कल्याणी–मला वाटतं तुझा रस्ता चुकलेला असावा.

सदानंद-ताईसाहेब, परमेश्वरानं मला जन्म दिला ही त्याची चूक निस्तरण्यासाठींच जगतोंय मी ! आयुष्याचं ध्येय डोळ्यांना दिसत असलं तरी माझे पाय मात्र मला दुसरीकडं कुठंतरी फरपटत नेत आहेत

कल्याणी–केवढं कटु सत्य सांगितलंस तूं ! माझ्या आयुष्याच्या आकांक्षा अगदीं वेगळ्या असूनही मनाविरुद्ध जगण्याचा प्रसंग आलाय माझ्यावर !

बकुळा–अग बया ! ताईसाब, आपल्याला देवाला जायचंय् ना ?

**कल्याणी**–बरी आठवण केलीस ! काय ग, तुझ्या नवऱ्याची प्रकृती बरी आहे ना ?

**बकुळा**–जी व्हय !

**कल्याणी**–तुझ्या नवऱ्याला बरं वाटावं म्हणून मी कोटेश्वराला नवस बोलले होते. जा, माझी पर्स आणि छत्री घेऊन ये. (बकुळा जाते.) सदानंद, मला वाटतं तूं कुणाशीं तरी लपंडाव खेळतो आहेस !

**सदानंद**–लपंडाव खेळण्यासाठीं दुसरं कुणीतरी असावं लागतं. मला दुसरं कुणीच नसल्यामुळं सध्यां मी माझ्याशींच लपंडाव खेळतोंय !

**बकुळा**–( छत्री आणि पर्स घेऊन येते ) ताईसाब हीं घ्या.

**कल्याणी**–( पर्स घेऊन ) चल, सदानंद आम्हीं कोटेश्वराला जातों. ( कल्याणी व बकुळा जातात. )

**सदानंद**–( त्या गेल्यानंतर दरवाजाजवळ जाऊन बाहेर पहातो आणि तेथून परत येतांना. ) कल्याणीदेवी, मी कोण आहें हें जर तुम्हांला समजलं, तर तुम्हांला काय वाटेल माझ्याबद्दल ? भूतकाळ काळा बुरखा पांघरून जातो, तर भविष्यकाळ काळा बुरखा पांघरून येतो माझा भूतकाळ तुम्हाला माहीत नाहीं आणि तुमचा भविष्यकाळ मला माहीत नाहीं, यांतच आपण सुखी आहोंत. ( जातो. )

(धोंडीराम दरवाजाच्या पडद्यांतून रंगभूमीवर पहातो, नंतर बिचकत बिचकत रंगभूमीवर येतो. स्टेजवर असलेल्या ग्रामोफोनवर एक गाण्याची रेकॉर्ड लावतो, आणि तिच्या गाण्याप्रमाणें तोंड हालवीत नाचतो. हें चालू असतांना एस्. विश्वनाथ व कुलंगडी दरवाजांत येऊन धोंडीरामचा नाच पहात एकमेकांकडे पाहून मिष्किलपणें हंसतात. )

**विश्वनाथ**–वन्स मोअर ! वन्स मोअर ! ( दोघे टाळ्या वाजवितात. धोंडीराम दचकून ग्रामोफोन बंद करतो. ) शाबास धोंडीराम ! याला म्हणतात–

**कुलंगडी**–प्रामाणिक कलावंत! धोंडीराम चांगला सिनेमा नट होशील तूं!

**धोंडीराम**–( अजीजीनें ) हें सगळं तुमच्या हातांत आहे साहेब!

**विश्वनाथ**–काका, याला मी दमयंती चित्रपटांत काम देणार आहें.

**धोंडीराम**–( विस्मयाचा धक्का बसून ) काय म्हणतां साहेब?

**विश्वनाथ**–होय. मी तुला दमयंतीचा हंस करणार आहें.

**धोंडीराम**–साहेब, हंसच काय, पण कावळासुद्धां होईन मी! पण मला एकदां सिनेमांत चान्स मिळूं द्या, मला एकदां रुपेरी पडद्यावर झळकूं द्या.

**कुलंगडी**–झळकशील! झळकशील! पण पडद्यावर येण्यापूर्वी पडद्याआड राहून काम करावं लागतं.

**धोंडीराम**–हो का! पडद्याआड राहून काम करावं लागतं हें मला माहीत नव्हतं साहेब!

**कुलंगडी**–समजेल तुला सगळं.

**विश्वनाथ**–बरं, तुझ्या ताईसाहेब कुठें आहेत?

**धोंडीराम**–त्या कोटेश्वराला गेल्या आहेत.

**विश्वनाथ**–हो का! बरं जरा पाणी घेऊन ये.

**धोंडीराम**–बर्फ घालून आणूं कीं साधंच?

**विश्वनाथ**–साधंच घेऊन ये. ( धोंडीराम जातो. ) काय रे काका, ही कल्याणी कोटेश्वराला गेलीय् म्हणे! अरे, आमच्यासारखे धूतपापेश्वर इथं असतांना तो कोटेश्वर कशाला पाहिजे? काका, प्रत्येक नटी माझ्याभंवतीं कुलंगी कुत्र्यासारखी गोंडा घोळत असते. पण इथं मात्र–

**कुलंगडी**–तुला गोंडा घोळीत यावं लागतंय्!

**विश्वनाथ**–अरे छट्! त्या थेरड्या बापूसाहेबानं मला निरोप द्यायला सांगितला म्हणून आलों मी.

कुलंगडी–आलास तसा बैस जरा, मग त्या म्हाताऱ्याच्या टाळक्याचे काय केस उपटायचे असतील ते उपट ! (दोघे बसतात)

विश्वनाथ–आज काय म्हणे गिरणी कामगारांना बोनस वाटायचा दिवस आहे त्याचा ! लेकाचा सगळयांना कपडे वाटतोय, जेवणं घालतोय् ! जसं कांहीं त्या थेरडयाच्या लग्नाचं गांवजेवणच चाललंय् ! सगळा चोरांचा बाजार !

कुलंगडी–विशा, अरे त्यांनं तुला भांडवल दिलंय् ना ?

विश्वनाथ–माझ्यावर मोठे उपकारच केलेत कीं नाहीं त्यानं ! या कल्याणीसारख्या नटीचा सहवास पाहिजे म्हणून दोन लाख रुपये ओतायला तयार झाला तो ! कळत नाहींत का मला या गोष्टी ? आतां हें माझं दमयंतीचं कथानक–

कुलंगडी–हें दमयंतीचं कथानक तुझं? अरे तें चोपडं दुसऱ्याचं होतं ना?

विश्वनाथ–मग ? असलं म्हणून काय झालं ? तें माझंच कथानक आहे. असा जर मी दुसऱ्याला पुढं आणूं लागलों तर माझ्या पोटावर पाय येईल ना ! अरे असा धंदा केल्याशिवाय भागणार नाहीं. असो. या कथानकाचे पांच हजार मागितले मी, तर तो कद्रू म्हातारा पांच पै द्यायला तयार होईना.

कुलंगडी–अरे पण तुझ्या डायरेक्शनचे पंधरा हजार घेतलेस ना ? त्या म्हाताऱ्याला कापणार तरी किती ?

विश्वनाथ–काका, त्या म्हाताऱ्याचा या कल्याणीच्या बाबतीत कांहीं-तरी डाव असला पाहिजे.

कुलंगडी–अरे असणारच ! अरे बाबा, त्या म्हाताऱ्याची आणि या कल्याणीच्या लग्नाची बातमी आपल्याला एके दिवशीं वर्तमानपत्रांत वाचायला मिळेल. पण तुला वाईट वाटायचं कांहींच कारण नाहीं.

विश्वनाथ–मला वाईट वाटायचं काय कारण ? सिनेमासृष्टीचा

विश्वामित्र आहे मी! कल्याणीसारख्या अनेक मेनका नाचतील माझ्यासमोर आणि कित्येक शकुंतलांचा बाप होईन मी! (हलकेच) पण त्या थेरड्याचा ताबा इथं येण्यापूर्वी माझा कबजा झाला पाहिजे.

कुलंगडी–शेक हॅण्डस्! तूं आपली पाऊलवाट कशी मळवायची तें ठरव. मी इथला नवा चेहरा जरा चाचपून पहातों.

धोंडीराम–(पाण्याचे ग्लास ट्रेमधून आणतो) साहेब, पाणी–(दोघांना पाणी देतो.)

विश्वनाथ–(पाणी पिऊन) काका, या धोंडीरामची मेक अप ट्रायल घे, कॅमेरा टेस्ट घे आणि त्या स्टिल फोटोग्राफरला सांगून दोन डझन स्टिल्स काढ.

कुलंगडी–हें काम मी आजच करणार आहे.

धोंडीराम–होय का साहेब?

कुलंगडी–यस्! धोंडीराम आम्ही हंसाची ड्रेपरी तयार केली आहे. पांढरेशुभ्र पंख आणि पिसं लावलेला एक गाऊन तयार केला आहे. ते सगळे कपडे तुझ्या अंगावर घालून तुझे आज मी झकास फोटो काढणार आहें.

धोंडीराम–पण साहेब, तो तसला ड्रेस मला चांगला दिसेल का हो? नाहींतर त्या डौलदार हंसाऐवजीं गिधाडासारखा दिसायचा मी!

कुलंगडी–भलतंच कांहींतरी बोलूं नकोस. दमयंतीचा रोमॅन्टिक हंस शोभून दिसशील तूं! गिधाडासारखे काय ते आम्हीच दिसतों. (हंसतो.) अरे हो विश्वनाथ, तुझा निरोप–

विश्वनाथ–धोंडीराम, कल्याणीदेवींना बापूसाहेबांचा निरोप आहे.

धोंडीराम–ते तर मघाशीं इथं येऊन गेले.

विश्वनाथ–मग मला निरोप कशाला द्यायला सांगितलान् त्या म्हाताऱ्यानं?

**कुलंगडी**–अरे ही तर सगळी बनवाबनवी आहे. आपल्याला काय करायचंय ? निरोप द्या म्हटलं, दिला निरोप !

**विश्वनाथ**–ते बापूसाहेब कल्याणी देवीची खास मुलाखत घ्यायला येणार आहेत. तेवढं सांग तूं त्याला. बरं, काका मला एक कल्पना सुचलीय्.

**कुलंगडी**–आतां काय सुचलं तुला आणखीन् ? कायरे, तुम्हा दिग्दर्शकांना कुठंही कल्पना सुचतात का रे ?

**विश्वनाथ**–यस् ! आम्ही दिग्दर्शक लोक नेहमीं कल्पनासृष्टींत संचार करीत असतों. अरे, आम्हाला बाथरूममध्येंही कल्पना सुचतात ! माझ्या या पिक्चरमध्यें मी एक मास अपील सीन टाकणार आहें. नलदमयंती वनवासांत गेल्यावर चालून चालून दमल्यामुळं दमयंती एका झाडाखालीं गाढ झोपीं गेलेली आहे. दमयंतीच्या अंगावर तलम पातळ आहे. नलराजा तिचं अर्धं पातळ नेसून तिला तिथंच सोडून निघून गेलेला आहे ! मग दमयंती जागी होऊन शोक करीत आहे ! ही अर्ध्या पातळांतली दमयंती किती सुंदर दिसेल, नाहीं का ? या सीनमध्यें मास अपील आहे ! सेक्स अपील आहे ! अरे बाबा, ही अर्ध्या पातळांतली दमयंती पहाण्यासाठीं प्रेक्षक वेडे होतील वेडे ! नंतर मग एक भला मोठा अजगर त्या दमयंतीला गिळूं लागतो. त्या अजगराचं काम–

**धोंडीराम**–मी करीन. साहेब, मी अजगर होईन.

**कुलंगडी**–(हंसत) अरे वा ! धोंडीराम, तूं हंसही होणार आणि अजगरही होणार ! छान !

**धोंडीराम**–पण साहेब, माझं नांव बदललं पाहिजे. धोंडीराम हें नांव कसंसंच वाटतं. नाहीं का ?

**विश्वनाथ**–अगदींच रुक्ष वाटतंय्. ( विचार करीत) तुझं नांव–तुझं नांव- दीपक–कुमार–छे–सुहासकुमार–नो, नो–प्रदीप–छे–

**धोंडीराम**–(एकदम) धीरजकुमार ठेवा साहेब.

**विश्वनाथ**–धीरजकुमार! छान! छान! धीरजकुमार! वाः! धोंडीराम, अरे तूं इतका बुद्धीचा बृहस्पती असशील अशी मला कल्पना नव्हती.

**कुलंगडी**–अरे बाबा, झांकलीं माणकं आहेत हीं! आपण त्यांची किंमत केली पाहिजे. (सुस्कारून) बिचारा पोटासाठीं काम करतोय्!

**धोंडीराम**–साहेब, तुमच्या कामाला तर केव्हांच सुरवात झालीय.

**विश्वनाथ**–पांच हजार फुटांचं शूटिंग संपलंय.

**कुलंगडी**–फारच घाई चाललेली असते तुझी! अरे पैसा खर्च करायला कुबेर पाठीशीं उभा असतांना इतकी घाई कशाला? जरा मजेंत काम चालूं दे कीं! नाहींतरी मराठी डायरेक्टरांना चोवीस तास कष्ट करायची संवयच असते. हिंदी सिनेमाचा जमाना म्हणजे अगदीं बादशाही थाट! भल्या पहांटे म्हणजे दुपारीं बारा वाजतां डायरेक्टरसाहेबांनीं स्टूडियोंत यायचं. नंतर आस्तेकदम स्पॉटची पहाणी करायची. मग नाष्टा करायचा. पुढं शूटिंगला सुरवात करायची. आठ तासांत एक ओके शॉट झाला म्हणजे स्वर्गाला हात लागले त्यांचे. नाहींतर आपले मराठी दिग्दर्शक! आठ तासांत पांच सेटवर ओके शॉटस् घेतील, दमछाक करीत.

**विश्वनाथ**–चालायचंच! अरे मराठी सिनेमाला पैशाची नेहमींच चणचण असते. लाख सव्वा लाखांत मराठी चित्रपटाला गाशा गुंडाळावा लागतो. हिंदी सिनेमाप्रमाणं दहावीस लाख रुपये देणारा दाता मिळतो का आपल्याला? बरं धोंडीराम, तुला मुद्राभिनय सांगतों.

**धोंडीराम**–मुद्राभिनय! मुद्रा-मुद्रा.

**विश्वनाथ**–अरे मुद्रा म्हणजे तोंड–चेहरा; त्यावर दिसणारे विकार! असा गोंधळून जाऊं नकोस. हें बघ; तुला एक वाक्य सांगतों मी. तें तीन प्रकारानीं म्हणून दाखवायचं.

**धोंडीराम**–तीन प्रकारानीं म्हणजे?

**विश्वनाथ**–सांगतों. अगोदर तें वाक्य सांगतों. तीन रंगांचे

बटाटे आहेत.

**धोंडीराम**–साहेब स्वैंपाकी आहें मी. तीन रंगांचे बटाटे असतात का कधीं ?

**विश्वनाथ**–वाक्य ऐक रे. तीन रंगांचे बटाटे आहेत. पांढरे बटाटे.

**धोंडीराम**–(विचार करीत अंड्याप्रमाणें ज्ञात करून) पांढरे बटाटे.

**विश्वनाथ**–हिरवे बटाटे.

**धोंडीराम**–(विस्मयानें) अरेच्या ! हिरवे बटाटे !

**विश्वनाथ**–तांबडे बटाटे.

**धोंडीराम**–बरं ! बरं ! तांबडे बटाटे.

**विश्वनाथ**–काय समजलास ? हे तीन रंगांचे बटाटे तीन रसांत बुडवून काढायचे.

**धोंडीराय**–अगदीं पाकांतल्या पुरीसारखे ?

**विश्वनाथ**–यस्. पाकांतल्या पुरीसारखे.

**धोंडीराम**–मी जरा स्वैंपाकघरांत जाऊन येतों.

**विश्वनाथ**–कां रे ?

**धोंडीराम**–पाकशास्त्राचं पुस्तक बघतों. कारण तुम्हीं तीन रस म्हणतां. पण मला फक्त दोनच रस माहीत आहेत. एक आंबरस आणि दुसरा सुधारस. हा तिसरा रस कोणता ?

**विश्ववाथ**–तसला सुधारस नव्हे. नवरसांपैकीं वीररस, हास्यरस, आणि करुणरसांत हें वाक्य म्हणायचं. बघ मी आतां वीररसांत म्हणतों. (पविश्रा टाकून) तीन रंगाचे बटाटे आहेत. पांढरे बटाटे, हिरवे बटाटे, तांबडे बटाटे. आतां हास्यरसांत. (हंसत वाक्य म्हणतो) आतां करुणरसांत (रडत वाक्य म्हणतो) तूं म्हण बघूं.

**धोंडीराम**–(रडत) तीन रंगांचे बटाटे आहेत. पांढरे बटाटे, हिरवे बटाटे, तांबडे बटाटे.

**कुलंगडी**–( हंसत ) शाबास ! धोंडीराम शाबास ! जमेल तुला सगळं. जरा प्रॅक्टिस केली पाहिजे इतकंच.

**विश्वनाथ**–आतां तुला मुद्राभिनयाची कल्पना देतों. एक साप आलाय इथं.

**धोंडीराम**–( घाबरून ) काय ? साप !

**विश्वनाथ**–घाबरूं नकोस असा. कल्पना कर कीं इथं साप आलाय्. तो पाहिल्यावर घाबरून म्हणायचं ' बापरे ! साप ! ' समजलं ? आतां तो तुझ्या पायावर चढलाय तर भिऊन ओरडायचं ' साऽऽप ' आणि तो तुझ्या डोक्यावर अचानक पडलाय तर एकदम किंचाळायचं ' साऽऽऽऽप ! ' किंचाळ बघूं–हं किंचाळ.

**धोंडीराम**–( वेडा वांकडा चेहरा करीत ) '–साऽऽऽऽप ! '

**कुलंगडी**–छान ! छान ! धोंडीराम–नव्हे धीरजकुमार, अरे जमतंय कीं तुला सगळं. आतां आमचं जमव म्हणजे झालं. ( हलकेच ) सगळा बंदोबस्त नीट होईल ना ?

**धोंडीराम**-त्याची तुम्हीं काळजी करूं नका साहेब. सगळा ठीक बंदोबस्त होईल.

**कुलंगडी**–मग हरकत नाहीं.

**विश्वनाथ**–आमचा तेवढा निरोप सांग बरं का.

**धोंडीराम**–सांगेन.

**विश्वनाथ**–चल काका. मला आर्ट डायरेक्टरला भेटायचंय्. मी कल्याणी देवीनां स्टूडियोंत नेण्यासाठीं येईन परत. येतों आम्हीं धीरजकुमार. (जातात)

**धोंडीराम**–(तीन रंगांचे बटाटे आहेत ही प्रॅक्टीस करतो. नंतर) बस्. आतां गाण्याची प्रॅक्टीस करावी. (फोनोवर गाणें लावतो व अभिनय करूं लागतो; बकुळा प्रवेशून थोडी विस्मयानें पहाते. )

**बकुळा**–आवं साहेब, काय करता ह्ये ?

**धोंडीराम**–गाणं म्हणतोंय मी.

**बकुळा**–तुमी गानं म्हनताय्! अत्ता ग बया! अन् ह्यो फोनू वाजतुया न्हवं का ?

**धोंडीराम**–अग, फोनोचं रेकॉर्ड गाणं म्हणणार आणि मी नुसतं तोंड हालविणार !

**बकुळा**–म्हंजे ? मला नाय समजलं.

**धोंडीराम**–नाय समजलं ? याला उसन्या आवाजांतलं गाणं म्हणतात. प्लेबॅक म्हणतात. प्ले–बॅक.

**बकुळा**–अजून न्हाई समजलं.

**धोंडीराम**–(वीरश्रीनें तीन रंगांचे बटाटे वाक्य म्हणून विचारतो.) काय समजलं तुला ?

**बकुळा**–काय नाय बा !

**धोंडीराम**–(आवेशानें) प्लेबॅक, बॅकग्राऊंड म्यूझिक, लाईटस् ऑन-स्टार्ट, कॅप, शूट्, कट्, काय समजलं तुला ?

**बकुळा**–न्हाई उमगलं.

**धोंडीराम**–याला सिनेमा म्हणतात. मी आतां सिनेमा नट होणार आहें. आज मी इथं स्वैंपाक करतोंय पण उद्यां–उद्यां (रुबाबानें) आय ॲम गोइंग टु बी ए स्टार. ताईसाहेबांच्या दमयंती सिनेमांत मी हंस होणार आहें, दमयंतीला गिळणारा अजगर होणार आहें.

**बकुळा**–अग बया बया ! म्हंजे तुमी साप व्हनार !

**धोंडीराम**–साप नव्हे, अजगर ! सापाचा बाप होणार आहें. दिसेल लवकरच तुला तें. (प्लेट लावून) अशा गोड आवाजांत लोक माझं गाणं ऐकतील. (ॲक्टिंग करतो, बकुळा हंसते) कां ग, हसतेस कां ?

**बकुळा**-(हंसत) आवं, ह्ये बाईचं गानं हाय जनू !

**धोंडीराम**–बाईचं असलं म्हणून काय झालं ? बुवापेक्षां बाईच्याच गाण्यावर प्रॅक्टीस करायला जरा सोपं जातं. (बाहेरून कल्याणीची हांक येते. 'बकुळा, अग बकुळा.' ) अरे बापरे ! बकुळा, ताईसाहेब आल्याचं कां तूं मला सांगितलं नाहींस ? (गडबडीनें फोनो बंद करतो.)

**बकुळा**–त्या मागच्या बागंमंदी गेल्या व्हत्या.

**धोंडीराम**–म्हणून काय झालं ! (घाईनें आंत जातो. त्याच्या मागोमाग बकुळा जाते )

(कल्याणी फुलांचा गुच्छ घेऊन प्रवेश करते)

**कल्याणी**-

## गाणं

तरुबाला ही विमला, सुखदा रूपकला ।
मोहक सारा प्रीत फुलोरा । फुलवित बाला ।। सुखदा ।। धृ० ।।
ऋतुराजा येउनियां । खुलवित तिजला प्रेममया ।
शोभा दावी सकला रूपकला ।। १ ।।

**कल्याणी**–(गाणें संपल्यावर तेथील फ्लॉवर पॉटमध्यें गुच्छ ठेवते. ) धोंडीराम, ए धोंडीराम–

**धोंडीराम**–(प्रवेशून) काय ताईसाहेब ?

**कल्याणी**-कथानकाची फाईल दे बघूं. आरशाच्या टेबलांत असेल.

**धोंडीराम**–बघतों हं. (टेबलाचे ड्रॉवर बघतो)ताईसाहेब, ती फाईल इथं नाहीं.

**कल्याणी**–नीट बघ.

**धोंडीराम**–ती इथं नाहीं म्हणजे तिथं असली पाहिजे. त्या सदानंदाला इथलीं मासिकं न्यायची संवय आहे. ( सदानंदाच्या दाराकडे जाऊन ) सद्या, ए सद्या–(चमकून कल्याणीकडे पहातो) सॉरी हं ! सदानंद, ए सदानंद–

**सदानंद**–(प्रवेशून)काल ही फाईल मी चुकून नेली होती. ( कल्याणीला फाईल देतो.)

**धोंडीराम**–ताईसाहेब, बापूसाहेब शहाणे आपल्याला भेटायला येणार आहेत असा एस्. विश्वनाथनीं निरोप दिलाय.

**कल्याणी**–बापूसाहेब शहाणे आणि मला पुन्हां भेटायला येणार ? कां बरं ?

**धोंडीराम**–तें मला माहीत नाहीं.

**कल्याणी**–बरं, जा तूं. (धोंडीराम जातो. फाईल चाळीत ) सदानंद, तूं वाचलंस हें कथानक ?

**सदानंद**–वाचलं नाहीं. चाळलं थोडंसं.

**कल्याणी**–माझी दमयंतीची भूमिका कशी वाटली तुला ? अगदीं खरं सांग.

**सदानंद**–मला मुळींच आवडली नाहीं. या कथानकांतली दमयंती विसाव्या शतकांतली तरुणी दिसते. पांच वारी निनॉनचं भडक पातळ नेसून वेण्यांचे दोन शेपटे सोडून, हिलमन मोटारीनं ती नळ नांवाच्या श्रीमंत प्रियकराला भेटायला जाते असं वाटतं. मॉडर्न टच्च्या नांवाखालीं जुन्या सोज्बळ कथानकाचा अगदीं बोजवारा उडवला आहे प्रेक्षकांचं लक्ष वेधून घेण्यासाठीं. नको तिथं नाचाचे प्रसंग टाकले आहेत. त्यामुळें दमयंती ही राजकन्या आहे कीं धंदेवाईक नाचणारी बाई आहे तेंच समजत नाहीं. सेक्स अपीलच्या नावाखालीं स्त्री सौंदर्याचं उत्तान प्रदर्शन केलंय्. !

**कल्याणी**–(विस्मयानें) तुझं शिक्षण कुठपर्यंत झालंय् ?

**सदानंद**–थोडंफार लिहितांवाचता येतं मला.

**कल्याणी**–थोडंफार वाचतां येणारा माणूस इतकं बोलणार नाहीं. बरं मी हें कथानक जरा वाचीत बसतें. बापूसाहेब आल्यावर मला कळव.

**सदानंद**–बापूसाहेब तुमच्याकडं येणार आहेत ?

**कल्याणी**–मघाशीं ते येऊन गेले. आतां पुन्हां कशाला येणार आहेत कुणास ठाऊक ! त्यांच्या अशा येण्यानं लोकापवादांत भर पडायची.

**सदानंद**–तसं भ्यायचं कारण नाहीं. तुम्हीं मात्र त्यांची मनोभूमिका नीट समजावून घेण्याचा प्रयत्न करा.

**कल्याणी**–ठीक आहे. (फाईल घेऊन आंत जाते)

(सदानंद तिथलीं वर्तमानपत्रें पहातो तोंच घंटा वाजते. सदानंद दाराजवळ जातो.)

**सदानंद**–या, या बापूसाहेब.

(बापूसाहेब हातांत पातळाचें पुडकें घेऊन प्रवेश करतात)

**बापूसाहेब**–कल्याणी देवी आहेत ना ? त्यांना माझा निरोप मिळाला असेलच !

**सदानंद**–बसा आपण. मी कळवतों ताईसाहेबांना. (जातो.)

(बापूसाहेब पातळाच्या पुडक्याला गोंजारीत विचारमग्न होतात.)

**सदानंद**–(प्रवेशून) ताईसाहेब येताहेत.

**बापूसाहेब**–बरं ! (सदानंदकडे रोखून पहात) काय रे, नांव काय तुझं ?

**सदानंद**–सदानंद.

**बापूसाहेब**–सदानंद ! अस्सं ? (विचार करीत) तुला कुठंतरी पाहिल्यासारखं वाटतंय !

**सदानंद**–(चमकून) छे ! छे ! शक्य नाहीं !

**बापूसाहेब**–कुठं पाहिलंय् तें आतां माझ्या नीट लक्षांत येत नाहीं, पण तुला मी बघितलंय् हें खास !

**सदानंद**–तुम्हांला कांहींतरी भास होत असेल !

**बापूसाहेब**–नाहीं रे बाबा, भास नव्हे, मला अंधुक अंधुक आठवतंय कीं तूं–

**सदानंद**–(गडबडीनें) मी नव्हे हो ! दुसरं कुणीतरी असेल ! माणसासारखीं माणसं दिसतात कधीं कधीं !

**बापूसाहेब**–माणसारखीं माणसं दिसतात ! सदानंद, अगदीं माझ्या मनांतलं बोललास तूं आणि तसल्या भासावरच मला सध्यां समाधान म्हणून घ्यावं लागतंय् ! (स्वतःशीं अर्धवट) माणसासारखीं माणसं दिसतात; हो ! अशीच होती ती ! माझ्या डोळ्यानीं मला फसवलं ! अशीच होती ती !

**सदानंद**–काय बोलतां तुम्हीं हें !

**बापू**–तुला नाहीं कळायचं तें. आणि कळालं तरी त्याचा कांहीं उपयोग नाहीं. कारण ही गोष्ट इतकी दूर गेली आहे कीं माझे हात तेथपर्यंत मुळींच पोहोंचणार नाहींत, तिला पहाण्यासाठीं माझे हे म्हातारे डोळे कसे आतुर झाले आहेत !

**कल्याणी**–(प्रवेशून) नमस्ते. (सदानंद, कल्याणी व बापूसाहेब यांच्याकडे पहातो आणि जातो.)

**बापू**–नमस्ते.

**कल्याणी**–आपला निरोप मिळाला मला.

**बापू**–आपण माझ्या विनंतीला मान देऊन थांबलांत; फार आभारी आहें मी.

**कल्याणी**–यांत आभार कसले ?

**बापू**–कल्याणी देवी, मनांत कांहीं हेतू धरून आलोंय मी तुमच्याकडं.

**कल्याणी**–(चमकून) हेतू ! (अस्वस्थ होऊन) कसला ?

**बापू**–कल्याणी देवी, आजचा दिवस माझ्या आयुष्यांत फार महत्त्वाचा आहे. दरवर्षी माझ्या हजारों कामगारांना मी या दिवशीं बोनस वाटतों. प्रत्येक पुरुष कामगाराला धोतरजोडी आणि स्त्रीला साडीचोळी देतों. वर्षांतून एक दिवस सर्वांना आनंदानं काढतां यावा म्हणून पगारी सुट्टी देतों.

**कल्याणी**–बरं. चहा घेतां कीं कॉफी घेतां आपण ?

**बापू**–तुम्हीं हा आपलेपणा दाखविलात एवढ्यानंच आनंद वाटतो मला. मी ज्या इच्छेनं इथं आलोंय् ती जर सफळ झाली तर सर्व कांहीं मिळेल मला.

**कल्याणी**–तुमची इच्छा ! म्हणजे ? (करुण स्वरांतील पार्श्वसंगीत)

**बापू**–कल्याणी देवी, तुम्हीं माझ्या गिरण्यांतून आणि कारखान्यांतून जर फिरून आलांत तर माझे सगळे कामगार आज तुम्हांला आनंदांत दिसतील. त्यांच्या अंगावर नवे कपडे आहेत, त्यांच्या खिशांत पैसा आहे. सर्वांना मी आज गोडधोड खायला घातलेलं आहे. प्रत्येकजण मला धन्यवाद देतोय्. स्वतःच्या मुलाप्रमाणं मी कामगारांची काळजी वहातों. त्यांच्या पायांत कांटा रुतला तर माझ्या काळजांतून त्याच्या वेदना निघतात. त्यांच्या सुखापुढं मी कधींही पैशाची पर्वा केलेली नाहीं. सगळीकडे आज सुख आहे, आनंद आहे, सर्वांचीं तोंडं प्रफुल्लित झालेलीं आहेत. ( गंभीरपणें ) पण कल्याणीदेवी, अशा आनंदाच्या प्रसंगीं त्या सुखसरोवराच्या कांठावर एक माणूस खिन्न अंतःकरणानं बसलेला आहे. दुसऱ्यांना सुख देतांना स्वतः दुःखी झालेला आहे; उदास झालेला आहे. ( गहिंवरतात. )

**कल्याणी**–त्या दुःखाचं कारण..!

**बापू**–( गहिंवरून ) कारण.. कारण..! त्याचं अंतःकरण त्याच दिवशीं दुभंगून गेलं. त्याच्या अंतःकरणावर दुर्दैवानं कठोर आघात करून त्याच्या चिंध्या केल्या. तें फाटलेलं आहे आणि अखेरचा निःश्वास सोडीपर्यंत त्याला त्या वेदना सहन कराव्या लागणार आहेत.

**कल्याणी**–अरेरे ! कोण तो माणूस ?

**बापू**–तो माणूस..कल्याणीदेवी.. तो माणूस मी आहें ! सात वर्षां-मागची गोष्ट आहे ही. माझ्या गिरणींत एका कामगाराचा लहान मुलगा मेला होता. यंत्रांचीं भलीं मोठीं चाकं धाडधाड आवाज करीत काळाच्या

करवतीप्रमाणं फिरत होतीं. जन्म आणि मरण यांच्या धारेवर उभा राहून त्या मुलाचा बाप काम करीत होता. चुकून माणसाचा हातपाय सांपडला तर त्याला यमाच्या दरबारांत फरपटत ओढीत नेणारे पट्टे फिरत होते. आणि.. आणि.. कल्याणीदेवी, कामगाराचा तो मुलगा एकदम यंत्रांत सांपडला ! मुलगा एकदम किंचाळला ! तो मुलगा मरणार.. त्याच्या देहाचे तुकडे होणार.. पण.. पण त्या यंत्रानं माझ्या काळजाचे तुकडे केले.. आणि तो मुलगा वांचला ! आणि त्या क्रूर काळाची तहान स्वतः-च्या रक्तानं भागविली ! अजून मला तें भयानक चित्र दिसतंय् ! हीच आठवण मला जाळीत असते !

**कल्याणी**–(बापूसाहेबांच्या दुःखाशीं समरस होऊन) कुणी वाचवलं त्या मुलाला ? त्याचं नांव काय ?

**बापूसाहेब**–(भावनातिशयानें) कल्याणी..त्याचं नांव..त्याचं धैर्य.. कल्याणी, त्या धैर्यानंच माझं मन खचलं ! पण– पण– त्या खचलेल्या मनाला देवानं थोडासा दुसरा आधार दिला, याला कारण तुम्ही आहांत !

**कल्याणी**–(आश्चर्यानें) मी ? मी काय केलंय् तुमच्यासाठीं ?

**बापूसाहेब**–कांहीं केलं नसलं तरी आतां करा एवढीच विनंती आहे.

**कल्याणी**–तुमच्या दुःखाचा भार हलका करण्यासाठीं ?

**बापूसाहेब**–हो ! त्यासाठींच ! माझ्याबद्दल सहानुभूती वाटते तुम्हांला ?

**कल्याणी**–कां नाहीं वाटणार ?

**बापूसाहेब**–हें पातळ आणलंय. (पुडक्यांतून पातळ काढतात) तुम्हांला देण्यासाठीं. याचा स्वीकार कराल ? (पातळ पुढें करतो)

**कल्याणी**–(पातळ घेऊन घडी उलगडून पहात) किती सुंदर आहे !

**बापूसाहेब**–(आनंदानें) आवडलं तुम्हांला ?

**कल्याणी**–हो.

**बापूसाहेब**–हें पातळ– कल्याणीदेवी. .नेसून याल तुम्हीं ?

(कल्याणी बापूसाहेबांकडे पहाते. विचार केल्यासारखें करून पातळ घेऊन आंत जाते. पडद्यांतून पुढील पार्श्वगीत सुरू होतें.)

## गाणें

चुरगळली काळानें कलिका ।।
जीवन होतें नवेंच तिजला,
फुलवित होती आस कोमला,
आणिक अवचित पडतां घाला,
कशी करपली जीवन लतिका ।।
मांगल्याचे मुग्ध मनोहर
विलसत होते भाव मुखावर
स्नेहलतेची ज्योती सुंदर
निळ्या नभांतिल शांत तारका ।।
मंदिर माझें तिनें उजळिलें
मधुर फुलांचे मळे फुलविले
जीवन माझें नवें उभविलें
कुठें हरपली गोड चंद्रिका ।।

(गीत चालू असतांना बापूसाहेब कुणाच्या तरी स्मृतीनें अस्वस्थ होऊन रंगभूमीवर येरझारा घालतात– बसतात– उठतात.)

(पडद्यांतून वरील पार्श्वगीत संपल्यावर कल्याणी बापूसाहेबांनीं दिलेलें पातळ नेसून येते. तिला पहातांच बापूसाहेब बद्ध नजरेनें पहात पुढें होतात.)

**बापूसाहेब**––(भावनावशतेनें) कल्याणी-कल्याणी-

**कल्याणी**––(अस्वस्थतेनें मागें सरकत) काय म्हणालांत ?

**बापूसाहेब**––(भानावर येऊन) कांहीं नाहीं–कांहीं नाहीं.

**कल्याणी**—असं काय बघतां माझ्याकडं ?

**बापूसाहेब**—( समाधानी मुद्रेनें ) इतक्या वर्षांनीं आज माझ्या मनाचं समाधान झालं !

**कल्याणी**—कसलं समाधान ?

**बापूसाहेब**—(भरल्या आवाजांत) कल्याणीदेवी, गुदमरलेल्या काळ-जाची तुम्हाला कल्पना नाहीं येणार ! कठोर काळानं हिसकावून नेलेली माझी प्रतिमा मला पुन्हां पहायला मिळाली ! हेंच-हेंच पहाण्यासाठीं माझे डोळे आसावलेले होते ! कल्याणीदेवी, माझ्या जीर्णशीर्ण मनाला तुम्हीं क्षणभर सुख दिलंत—फार आभारी आहें मी तुमचा—फार आभारी आहें !

**कल्याणी**—( गोंधळून ) काय बोलतां तुम्हीं हें ? मला नाहीं समजलं !

**बापूसाहेब**—तें समजून तरी काय उपयोग ? कल्याणीदेवी, ( अश्रू टिपीत ) माझ्या बोलण्याचा गैरसमज करून घेऊं नका. व्याकुळ झालेल्या माझ्या अंतःकरणाला तुम्हीं थोडं शांत केलंत ! मी—मी फार आभारी आहें. पण कृपा करून गैरसमज करून घेऊं नका; (थांबून) झालं माझं काम ! येतों मी. ( दरवाजाजवळ जाऊन) कृपा करून गैरसमज करून घेऊं नका (डोळे टिपीत जातात.)

(रंगभूमीवर क्षणभर शांतता पसरते)

**कल्याणी**—बापूसाहेब असं कां बरं वागले ? त्यानां कसलं तरी दुःख होतंय्; पण तें त्यांनीं बोलून दाखविलं नाहीं. हजारों कामगारांना सुखी, करणारा माणूस स्वतः दुःखी कां ? कामगाराच्या मुलाचा प्राण कुणी वाचवला तें त्यांनीं सांगितलं नाहीं ! असं कां ? ( वडिलांच्या फोटोजवळ येऊन ) बाबा, आपण गरीब होतों म्हणून आपण दुःखीकष्टी होतों. बापूसाहेब श्रीमंत आहेत तरीही ते दुःखी आहेत ! बाबा, दुःख सगळ्यांचा असाच पाठपुरावा करतं का ? ( खिन्नपणानें कोचावर बसते.)

(एस्. विश्वनाथ चोरट्या पावलांनीं प्रवेश करतो आणि कल्याणी-जवळ येतो, ती आपल्याच तंद्रींत आहे हें पाहून)

**विश्वनाथ**–कल्याणी देवी–

**कल्याणी**–(चमकून) कोण ?

**विश्वनाथ**–आपली प्रकृती बरी दिसत नाहीं.

**कल्याणी**–छे ! छे ! तसं कांहीं नाहीं. आपल्याला स्टूडियोंत जायचंय् ना ?

**विश्वनाथ**–हो. बापूसाहेब आले होते इथं ?

**कल्याणी**–आले होते.

**विश्वनाथ**–(संशयानें) माझ्याबद्दल कांहीं म्हणाले का ते ?

**कल्याणी**–कांहीं नाहीं बाई !

**विश्वनाथ**–मग एवढं आवर्जून येण्याचं कारण काय ?

**कल्याणी**–त्यांनीं मला हें पातळ दिलंय् !

**विश्वनाथ**–अस्सं काय ! (रागानें) म्हणजे त्यानं तुमचा धडधडीत अपमान केलाय् !

**कल्याणी**–यांत मला कांहीं अपमान दिसत नाहीं.

**विश्वनाथ**–कल्याणीदेवी, तुमचं मन अगदीं लहान मुलासारखं निर्मळ आहे. या बापूसाहेबानं आज गिरणींतल्या कामगार स्त्रियांना साड्या वाटल्या. आणि तुम्हांला हें पातळ दिलंन् ! यावरून तो तुम्हांलाहि कामगार स्त्री समजतो कीं काय ?

**कल्याणी**–तसं नव्हे हो ! ते फारच भावनावश झालेले होते त्यांना कसलं तरी दुःख होतंय् !

**विश्वनाथ**–म्हणजे तो म्हातारा पक्का नाटकी आहे ! भावनेचा बुरखा पांघरलेला असला माणूस आपली तीक्ष्ण वाघनखं केव्हां बाहेर काढील त्याचा नेम नाहीं !

**कल्याणी**–आपल्याला स्टूडियोत जायचंय ना ?

**विश्वनाथ**–कल्याणीदेवी, स्वतःच्या कलेबद्दल इतकी आत्मीयता बाळगणारे कलावन्त फारच विरळा ! पण माझ्या सुवर्णमहोत्सवी चित्रपटाची नायिका इतकी एकनिष्ठ आहे कीं–

**कल्याणी**–सुवर्णमहोत्सव ! ही कसली नवी कल्पना काढलीत ?

**विश्वनाथ**–या माझ्या दमयंती चित्रपटाचा सुवर्णमहोत्सव मी पहिल्याच आठवड्यांत साजरा करणार आहें.

**कल्याणी**–पहिल्याच आठवड्यांत सुवर्ण महोत्सव ! म्हणजे ?

**विश्वनाथ**–मी हा चित्रपट पहिल्याच आठवड्यांत एकावन्न थिएटरमध्यें दाखविण्याची व्यवस्था करणार आहें. आणि एकावन्नावा संयुक्त आठवडा जाहीर करून पहिल्याच दिवशीं सुवर्ण–महोत्सवाची धमाल उडवून देणार आहें. आजपर्यंत कोणत्याही डायरेक्टरनं असलं धाडस केलेलं नाहीं. पण कल्याणीदेवी, याचं सगळं श्रेय तुम्हांला आहे बरं का ! ( जवळ जातो)

**कल्याणी**–(हंसत) निघूं या आपण ! सदानंद, ए सदानंद– (सदानंद येतो) चल स्टूडियोंत.

**सदानंद**–मी कोट घेऊन येतों. (जातो)

**कल्याणी**–डायरेक्टरसाहेब, हा सदानंद कोण वाटतो तुम्हांला ?

**विश्वनाथ**–कोण म्हणजे ? तुमचा नोकर.

**कल्याणी**–तो दिसतो नोकरासारखा, पण फार विद्वान आहे बरं का!

**विश्वनाथ**–विद्वान ? (हंसतो) विद्वान नसेल, इद्वान असेल इद्वान !

**कल्याणी**–तो दिसतो तसा नाहीं बरं का !

**विश्वनाथ**–साध्या माणसाबद्दल इतका विचार करूं नाहीं तुमच्या सारख्यांनीं ! असलीं वरून वेंधळीं दिसणारीं माणसं मालकाला केव्हां कसली टोपी घालतील–

**सदानंद**– (सदानंद टोपी घालीत प्रवेशून ) नाहीं साहेब, मी हीच

टोपी घालतों.

**विश्वनाथ**–(हंसत) चला.(विश्वनाथ, कल्याणी व सदानंद जातात.)

**धोंडीराम**–(दबकत प्रवेश करून आरशासमोर उभा राहतो) हॅलो, धीरज कुमार, यू आर ए फिलमस्टार ! (रुबाबानें शीळ घालतो.) आतांच त्या हंसाची पिसं अंगावर चढल्या सारखं वाटतंय मला. मी अजगर होणार ! अंगांत कसं अवसान चढल्यासारखं झालंय ! (कुलंगडी दरवाजा-जवळ येऊन खाकरतो) या, या साहेब.

**कुलंगडी**–बेबी गेली कारे ?

**धोंडीराम**–होय साहेब, सगळीं माणसं गेलीं.

**कुलंगडी**– मग घरांत कोण आहे ?

**धोंडीराम**–बकुळा.

**कुलंगडी**–(विचारपूर्वक)ठीक आहे! धीरजकुमार, मी माझ्या असि-स्टंटला सर्व सांगून ठेवलंय्. तूं असाच स्टूडियोंत जा. तो तुझे मेक अप-मधले फोटो घेईल. विश्वनाथ तुझी माईक टेस्ट घेईल.

**धोंडीराम**–साहेब–साहेब–तुमचे उपकार कसे फेडूं मी ?

**कुलंगडी**–माझे उपकार फेडायचे असतील तर स्टूडियोंत जा, एकदम जा!

**धोंडीराम**–हा निघालोंच (घाईनें कोट घेऊन येतो.)जातों सांहेब. (जातो.)

**कुलंगडी**–(मिश्किलपणें हंसत) पहारेकरी नसला कीं खजिना उघडा पडतो. (बाहेर जातो. दारावरची घंटा वाजवितो.

**बकुळा**–(प्रवेशून)सायेब, आवं सायेब! कुटं ग्येला ह्यो सायेब कुनास ठावं.(घंटा वाजते) कोन हाय ?

**कुलंगडी**–(प्रवेशून सभ्यपणाचा आव आणून)मी आहें. बेबी आहे का?

**बकुळा**–ताईसाब घरांत न्हाईत.

कुलंगडी–स्टूडियोंत गेली वाटतं ती? (कोचावर येऊन बसतो बकुळा आंत जावयास निघालेली पाहून) बकुळा, किती पगार मिळतो ग तुला?

बकुळा–मिळतो पोटापुरता.

कुलंगडी–म्हणजे हा पगार अपुरा पडत असेल तुला, नाहीं का ? तुझे कारभारी आजारी आहेत. त्यानां नोकरी नाहीं. त्याभुळं तुम्हांला त्रास होतोय् ! सगळं समजलंय् मला !

बकुळा–चालायचंच ! वंगाळ दिवस येत्यात मानसाला !

कुलंगडी–माणसाचं सुख पैशावर अवलंबून असतं! समज, तुला पैसा मिळाला, तर सुखांत रहाल तुम्हीं ?

बकुळा–मिळाला तर ! पण हे व्हनार कसं ?

कुलंगडी–मातीत पुरलेलं धन माहीत नसतं तोंपर्यंत त्याची किंमत मातीमोल असते. तसलं धन तुझ्याजवळ आहे. पण तुला तें दिसत नाहीं, म्हणून पैशाची वाण पडते तुला !

बकुळा–ह्यो बगा, तुमच्या बोलन्यांतलं मला येक सबूद बी कळला न्हाई !

कुलंगडी–जाणून बुजून आंधळे होतां तुम्हीं ! तूं जर मनांत आणलंस तर संपत्ती तुझ्या पांयावर लोळत येईल.

बकुळा–(आश्चर्यानें) म्हंजे ! म्हनता तरी काय तुमी ?

कुलंगडी–तूं जर सिनेमांत काम करशील तर पैशाचा पाऊस पडेल तुझ्यावर ! हें दारिद्र्य क्षणांत संपेल !

बकुळा–सिनिमांत काम करनं लई वंगाळ हाय बगा !

कुलंगडी–कुणी सांगितलं तुला हें ? या कल्याणीचंच पहाना, बोल बोल म्हणता पंचवीस हजार रुपये मिळविले तिनं ! तीसुद्धां झोपडींत रहात होती. पण तिनं आज हा बंगला बांधला. तिच्या सौंदर्यानं तिला हात दिलान ! बकुळा, तुझ्यासारख्या कित्येक सुंदर तरुणी–

**बकुळा**–( रागानें ) भलतंच बोलूं नका सायेब ! असलं काम माजं न्हवं ! मी हाय अडानी मोलकरीन !

**कुलंगडी**–तूं अडाणी असलीस म्हणून अडलंय कुठं ? तूं मोलकरीण असलीस म्हणून नडलंय कुठं ? बकुळा, डोळे उघडून या सिनेमातारकांकडे पहा. आजची एक प्रख्यात नटी पूर्वी उपाशी पोटीं तडफडत होती. पण आज तिच्या कुत्र्याला बिस्किटं खायला मिळताहेत ! एकेकाळीं खराट्यानं रस्ता झाडणारी मुलगी, सिनेमांत गेल्यावर त्याच खराट्यानं नोटा गोळा करूं लागली. दाराशीं भीक मागणारी भिकारीण एका फिल्म कंपनीची भागीदारीण झाली. असे कितीतरी प्रकार मी तुला दाखवून देईन. त्या तरुणी सिनेमांत गेल्या नसत्या तर आजही त्या शिळ्या भाकरीचे तुकडे मोडीत बसल्या असत्या.

**बकुळा**–तसला पैसा नग मला. माजी ओली कोरडी भाकरच सुखाची हाय !

**कुलंगडी**–(हंसत तिच्याजवळ जात) बकुळा, तूं सुंदर आहेस ! तरुण आहेस !

**बकुळा**–(संतापून) असलं वंगाळ बोलूं नका. ताईसाब घरांत न्हाईत.

**कुलंगडी**–म्हणून तर मी इथं आलों. बकुळा–

**बकुळा**–तुमी हतनं गुमान जा बगूं ! न्हाईतर !

**कुलंगडी**–काय करशील ग ?

**बकुळा**–कुत्र्यावानी फरपटत भाईर काढीन !

**कुलंगडी**–असली बाई जन्माला यायचीय् अजून !

**बकुळा**–वरडावरड करून मानसं गोळा करीन मी !

**कुलंगडी**–मरतुकडं कुत्रंसुद्धां यायचं नाहीं इथं ! बकुळा, हा नटीचा बंगला आहे. बंगल्यांतला आरडाओरडा ऐकण्याची बाहेरच्या लोकांना संवय आहे. नटीच्या बंगल्यांत कसला धुडगूस चालतो हें त्यानां चांगलं

माहीत असतं ! बकुळा, तुझ्यासारख्या लंकेच्या पार्वतीला मी सोन्यामोत्यानं मढवून काढीन. कशाला उगाच हट्टाला पेटतेस ? (पुढें सरकतो.)

**बकुळा**–(कमरेला पदर खोचून त्वेषानें) कोन समजलास रं तूं मला? वाऱ्यावर सोडलेली मुरळी न्हवं मो ! लगनाची बायकू हाय ! माज्या कारभाऱ्यास्नी ह्यं समजल तर त्ये तुजी खांडोळीं करत्याल !

**कुलंगडी**–समजलं तर ? (हंसतो) ती तुला काळजी नको. जास्त दंगा करशील तर लोक तुलाच हसतील !

**बकुळा**–गपचीप काळं त्वांड कर !

**कुलंगडी**–अरे वा ! अवसान तर खूप आगलंस कीं ! (हंसतो) एवढा सतीसावित्रीचा टेंभा मिरवतेस तर काम कशाला करतेस इथं ? (बकुळेचा हात धरण्याचा प्रयत्न करतो.)

(कल्याणी प्रवेशून विस्मयानें पहाते)

**बकुळा**–मुर्दाडा, घरांत कुनी न्हाई असं बगून आलास, पन मी एकलीच तुजी हाडं भरडून काढीन !

**कुलंगडी**–अशा दंगा करणाऱ्या पुष्कळ पोरी वठणीवर आणल्यात मी !

**बकुळा**–(त्वेषानें) मेल्या, म्होरं तर ये, मग बगते !

(कुलंगडी झपाट्यानें तिचा हात धरतो ती फाडकन् मुस्कटांत मारते )

**बकुळा**–चांडाळा, कोन समजलास रं तूं मला ? मी काय सिनिमांतली नटी हाय व्हय ? तुज्यासारखा आग्या येताळ मातींत गाडायला मला येळ न्हाई लागायचा ! माजं कुकू सबळ हाय अन् माजं मनगट बी बळकट हाय ! या वाघिनीचं दांत म्हाईत न्हाईत तुला !

**कुलंगडी**–(त्वेषानं) अस्सं काय ? (एकदम मनगट पकडतो)

**बकुळा**–( मनगट चावून) अश्शी हाडं कडाकडा फोडते वाघीन !

**कुलंगडी**–(मनगट चोळीत मागें सरकतो. एकदम) मीही असल्या वाघिणीचे दांत–(तिला धरायला जातो तोंच–)

**कल्याणी**–(संतापून) काका !

**कुलंगडी**–(चमकून) कोण ? वेबी !

**पडदा**



# अंक ३ रा

(स्थळ–दिवाणखाना–(कल्याणी अस्वस्थ मनानें स्टेजवर येते.)

**कल्याणी**–सदानंद, बकुळाकडं गेला होतास ना ?

**सदानंद**–(प्रवेशून) ताईसाहेब, आपण सांगितल्यानंतर तीन वेळां मी तिच्याकडे गेलों. दोन वेळां तिची गांठ पडली नाहीं.

**कल्याणी**–तसं नसेल. तिनं तुझी गांठ घेण्याचं मुद्दाम टाळलं असेल.

**सदानंद**–नाहीं. तसं झालं नाहीं. ती घरांत नव्हती. तिसऱ्या वेळेला मात्र गांठ पडली.

**कल्याणी**–मग ? माझा निरोप सांगितलास तिला ?

**सदानंद**–सांगितला.

**कल्याणी**–(अधीरतेनें) मग काय म्हणाली रे ती ?

**सदानंद**–तुमचा निरोप ऐकल्यावर ती थोडी विचारांत पडल्यासारखी दिसली.

**कल्याणी**–असं ! तसाच प्रसंग ओढवला होता तिच्यावर.

**सदानंद**–इथं यायला साफ नकार दिलान तिनं.

**कल्याणी**–(आश्चर्यानें) नकार दिलान !

**सदानंद**–होय ताईसाहेब. मी तिला समजावून सांगण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. काका कुलंगडीनं तिच्या अंगावर हात टाकल्यामुळं तिला तरी कोणत्या तोंडानं दोष देतां येणार ? शेवटीं मी एक युक्ति योजली.

**कल्याणी**–कोणती ?

**सदानंद**–बकुळेच्या अंतःकरणांत तुमच्याबद्दल आदरभावना आहे. त्या तसल्या प्रसंगामुळें जरी तिचं मन थोडंफार कठोर बनलं असलं तरी तिथंच आपलेपणाचा जिवंत झरा वहात आहे, याची कल्पना आहे मला ! म्हणून मी शेवटचा उपाय योजला.

**कल्याणी**–अस्सं ! म्हणजे तिनं इथं यावं असं तुलाही वाटतं तर ?

**सदानंद**–कां नाहीं वाटणार ? तुम्ही इथं एकट्या आहांत. तुमची काळजी घ्यायला कोण आहे इथं ? बकुळा तुम्हांला किती जपत होती, हें मी पाहिलेलं आहे. पावित्र्याच्या दाहक तेजानं स्त्रीच्या शीलाचं संरक्षण होत असतं. शीलाचं मोल स्त्रीलाच माहीत असतं. म्हणून ती इथं असावी असं मला वाटतं.

**कल्याणी**–सदानंद, माझ्या असहाय्यतेची तूं मला नकळत जाणीव करून दिलीस. (स्वतःशीं पुटपुटत) खरंच, मी असहाय्य आहें. म्हणून मला बकुळा पाहिजे.

**सदानंद**–मी बकुळेला म्हणालों, बकुळा, तूं जर आली नाहींस तर ताईसाहेब आज अन्नाला स्पर्श करणार नाहींत. हें ऐकतांच मात्र ती यायला कबूल झाली.

**कल्याणी**–असं म्हणालास तूं ? खरंच मी तसंच केलंय ! पण कसं ओळखलंस रे तूं ?

**सदानंद**–ताईसाहेब, फुलांचा सुवास दाखवितां येत नाहीं, पण तो समजतो. मनुष्याच्या भावनासुद्धां फुलांच्या सुवासाप्रमाणं असतात. त्या बोटानं दाखवितां येत नाहींत तर अंतःकरणानं समजावून घ्यावा लागतात. त्या प्रसंगापासून तुमच्या मनाची अस्वस्थता पहातोंय मी.

**कल्याणी**–अजून तो प्रसंग माझ्या डोळ्यांसमोर दिसतोय ! विजेचा प्रवाह एकाएकीं बंद पडल्यामुळं शूटिंग बंद ठेवावं लागलं म्हणून मी परत आले. मी जर वेळींच आले नसते तर बकुळावर आणखीन कोणतं संकट

कोसळलं असतं तें सांगतां येत नाहीं.

**सदानंद**–ताईसाहेब, कोणताही विपरीत प्रकार झाला असता तरीहि बकुळानं मोठ्या धैर्यानं त्याला तोंड दिलं असतं.

**कल्याणी**–काय रे सदानंद, बकुळा घरांत एकटी आहे हें काकाला समजलं कसं ?

**सदानंद**–यासाठीं जास्त विचार करायला नको.

**कल्याणी**–म्हणजे ?

**सदानंद**–त्यावेळीं धोंडीराम स्टूडियोंत होता.

**कल्याणी**–तो कशाला तिथं आला होता ?

**सदानंद**–त्यला सिनेमा नट व्हायचंय्. मी त्याला मेकअपरूमजवळ बघितलं. पण त्यानं मला पाहिलं नाहीं.

**कल्याणी**–त्याचा ह्या प्रकाराशीं काय संबंध ?

**सदानंद**–हाच तर खरा चक्रव्यूह आहे. सिनेमांत काम मिळावं म्हणून धोंडीरामनं संधान बांधलं. आणि त्या मोबदल्यांत काकाच्या सैतानी पकडींत बकुळाला वोढून द्यायचं, असा बेत ठरला आसावा ! नाहींतर तो स्टूडियोंत आला तेव्हां नेमक्या त्याच वेळेला काका इथं येणं शक्य नाहीं.

**कल्याणी**–तूं म्हणतोस त्यांत बरंच तथ्य असावं असं वाटतं मला.

**सदानंद**–त्याची खातरी करून घ्यायची असेल तर जरा आडवळणानं धोंडीरामला विचारा आणि खातरी पटल्यावर मात्र असला तिडका निखारा या बंगल्यांत ठेवायचा किंवा नाहीं हें तुम्हीं ठरवा.

**कल्याणी**–ठीक आहे. आतांच मी त्याला विचारते.

**सदानंद**–माझ्यासमोर नको. मी पलीकडे थांबतों. ( आंत जातो )

**कल्याणी**–धोंडीराम, ए धोंडीराम–

**धोंडीराम**–( प्रवेशून ) काय ताईसाहेब ?

**कल्याणी**–धोंडीराम, तूं म्हणे सिनेमांत काम करणार आहेस ?

**धोंडीराम**–( दचकून ) छे ! छे ! आम्हांला कोण चान्स देणार ?

**कल्याणी**–खोटं बोलू नकोस. परवां तूं स्टूडियोंत गेला होतास !

**धोंडीराम**–कुणी सांगितलं तुम्हांला ?

**कल्याणी**–तें तुला काय करायचंय्? माझ्या प्रश्नाचं उत्तर दे. गेला होतास ना ?

**धोंडीराम**–हो. गेलों होतों. काय म्हणणं आहे तुमचं ?

**कल्याणी**–तूं माझ्याकडं नोकरी करतोस.

**धोंडीराम**–(रुक्षपणें) मी तुमच्याकडं नोकरी करतों. पण याचा अर्थ असा नव्हे कीं मी माझं सगळं आयुष्य तुमच्या इच्छेप्रमाणं घालवावं.

**कल्याणी**–तुझं तत्वज्ञान ऐकायचं नाहीं मला. तूं स्टूडियोंत गेलास त्याबद्दल मला कांहींच म्हणायचं नाहीं. पण हें करतांना तूं जें पापी कृत्य केलंस त्याचा जाब पाहिजे मला.

**धोंडीराम**–मी कसलं पाप केलं ?

**कल्याणी**–मलाच उलटा प्रश्न विचारतोस ? धोंडीराम, तूं काका कुलंगडीला इथं घेऊन आलास. आणि त्या नीच माणसानं–

**धोंडीराम**–ताईसाहेब, त्यानां असे अपशब्द वापरूं नका. त्यांच्याच कृपेनं मला सिनेमांत काम मिळणार आहे.

**कल्याणी**–अस्सं काय ! धोंडीराम, तुला माझ्याकडं नीट नोकरी करायची आहे कीं सिनेमांत काम करायचं आहे ?

**धोंडीराम**–आतां कोण करतो असलं आचाऱ्याचं गांवठी काम ! मिस् कल्याणी देवी, नाऊ आय ॲम ए सिने-स्टार धीरज कुमार ! तुम्हांला माहीत नाहीं ताईसाहेब, मी या दमयंती चित्रपटांत पांढऱ्या पंखाचा हंस होणार आहें, तुम्हांला गिळून टाकणारा अजगर होणार आहें.

**कल्याणी**–असला अजगर माझ्या घरांत नको धोंडीराम, आजपासून मी तुला कामावरून कमी केलंय्.

**धोंडीराम**–इथं कोण लेकाचा सुजलाय आतां आचाऱ्याचं काम करायला ? तुम्हीं मला काढून टाकण्यापेक्षां मीच माझ्या कामाचा राजीनामा देतों.

**कल्याणी**–ठीक आहे. मग आत्तांच्या आत्तां इथनं निघून जा.

**धोंडीराम**–ऑल राईट. ताईसाहेब, मी कोट घेऊन येतों (जातो. सदानंद प्रवेशतो.)

**सदानंद**–झाली तुमची खातरी ? याला हाताशी धरून तो काका कुलंगडी सैतानी डाव खेळला.

**कल्याणी**–(अस्पष्ट) असल्या सैतानानींच घेरल्यासारखं झालंय् मला.

**सदानंद**–पण ताईसाहेब, धोंडीराम गेल्यावर स्वैंपाक कोण करणार?

**कल्याणी**–मी करणार आहें, तो गेला म्हणून माझी चूल खोळंबून बसणार नाहीं ? सदानंद, तुला कल्पना नाहीं, मला स्टूडियोपेक्षां स्वैंपाक-घर जास्त प्रिय आहे. तोंडाला रंग लावून कॅमेऱ्यासमोर उभं रहाण्यापेक्षां चूल फुंकणं आवडेल मला !

**धोंडीराम**–( प्रवेशून ) अच्छा. ताईसाहेब, येतों मी ! लवकरच आपण एका चित्रपटांत काम करण्यासाठीं एकत्र येऊं. त्या चित्रपटाची जाहिरात कशी होईल ठाऊक आहे तुम्हांला ? येणार, येणार, लवकरच येणार. लक्षांत ठेवा. सिनेमा सृष्टीच्या क्षितिजावर झळकणारा नवा तारा मास्टर धीरज कुमार आणि अभिनय चंद्रिका मिस् कल्याणी देवी–कल्याणी देवी बाय्बाय्–(जातो)

**सदानंद**–माणसाच्या मागें दुर्दैव लागतं. पण दुर्दैवाच्या मागें धावणारा माणूस म्हणून या धोंडीरामाकडे सहज बोट दाखवितां येईल. आणि याचं दुर्दैव म्हणजे ( कुलंगडी प्रवेशतो )

**कुलंगडी**–बेबी–

**कल्याणी**–( चमकून ) काका ! तुम्हीं कां आलात इथं ?

**कुलंगडी**–तूं मला असा प्रश्न विचारशील, अशी कल्पना होतीच मला. कर्तव्य म्हणून इथं आलों मी.

**कल्याणी**–तसंच आणखीन एक कर्तव्य पार पाडा.

**कुलंगडी**–कोणतं ?

**कल्याणी**–इथनं तावडतोब बाहेर जाण्याचं.

**कुलंगडी**–गैरसमजानं तूं हें बोलत आहेस. बेबी, त्या दिवशीं जो प्रकार झाला त्यावरून कुणाचाही गैरसमज होणं शक्य आहे. तो दूर करण्यासाठीं–

**कल्याणी**–तुम्हीं इथं येण्याची तसदी घेतलीत.

**कुलंगडी**–हो. कारण मी खुलासा केल्याशिवाय खरा प्रकार काय होता हें कसं कळणार तुला ? जन्माचं दारिद्र्य दूर करण्याचा बकुळेनं मला मार्ग विचारला. पण तिनं त्याचा विपरीत अर्थ करून घेतलान्. आणि ती माझ्याच अंगाशीं लगट करूं लागली. आणि तूं येतांच तिनं पवित्रा फिरविला. मी म्हणून गप्प बसलों. दुसरा कुणी असता तर त्यानं सव्याज फेड केली असती.

**कल्याणी**–झालं ना तुमचं बोलून ? का आणखीन कांहीं सांगायचं आहे ?

**कुलंगडी**–सांगायचं आहे तर ! त्या बकुळेला कामावरून एकदम काढून टाक. तुझ्या हिताच्या चार गोष्टी सांगणं हें वडीलकीच्या नात्यानं माझं कर्तव्य आहे, म्हणून सांगतों–

**कल्याणी**–काका, तुम्हीं आपलं कर्तव्य बजावलंत् आतां मी माझं कर्तव्य बजावते. सदानंद, यांना रस्त्यावर जाण्याचा मार्ग दाखव.

**सदानंद**–चला साहेब–

**कुलंगडी**–कल्याणी, काय करतेस तूं हें ?

**कल्याणी**–तुम्हीं मला हिताचा सल्ला दिलात त्याचा पहिला धडा गिरवते मी.

कुलंगडी–बेबी, अग शुद्धीवर आहेस का तूं ?

कल्याणी–शुद्धीवर नव्हते. पण आतां मात्र पूर्ण शुद्धीवर आले आहें.

कुलंगडी–कल्याणी, माझ्या वशिल्यामुळं तूं सिनेमा नटी बनलीस. नाहींतर उपाशी पोटीं मरावं लागलं असतं तुला ! तुझे वडील माझे स्नेही होते. म्हणजे मी तुला वडिलासारखा असून–

कल्यणी–माझ्या वडिलांच्या नांवाचा कशाला उच्चार करतां ? कांहीं शरम वाटते का तुम्हांला ? शहाजोगपणानं खोटं बोलून तुम्हीं आपल्या नीच कृत्यावर पांघरूण घालतां ! बकुळेचं पुन्हां नांव काढलंत–

बकुळा–(प्रवेशून) तर जीभ उपसून काढीन मुळापासून !

कुलंगडी–बकुळा !

बकुळा–व्हय. बकुळाच हाय मी ! नीट बगून घे मला. तुजं समदं बोलनं मी भाईर उभं राहून ऐकत व्हते. मुर्दाडा, मी तुझ्याशीं लगट केली व्हय रं ? कांहीं लाजबीज हाय कीं न्हाई ? कीं कोळूनशान प्यालास रं ?

कल्याणी–काका, अजून कांहीं खुलासा करायचा असला तर करा.

बकुळा–ताईसाहेब, त्येला कशापाईं खुलासा इचारतां ? मी करते समदा खुलासा. (आडवा पदर खोचते) काय रं ? गुमान भाईर व्हतोस कीं कान धरून फरपटत नेऊं तुला ?

कुलंगडी–बेबी, हा माझा अपमान आहे, तुझ्यासमोर तुझी मोलकरीण मला वाटेल तें बोलत असतांना–

कल्याणी–मी तिची बाजू घेत आहें. खरंच काका, चुकतंय माझं ! तुमच्यासारख्या सज्जन माणसाबद्दल वाटेल तो संशय मी घेणं हें पाप आहे ! काका, विषारी नागानं संन्यास घेतला तरी त्याचा विषारीपणा नाहींसा होत नाहीं, हें लक्षांत ठेवा. तुमच्या बाहेर चालणाऱ्या दुष्कृत्याचा घडा तुम्हीं माझ्या घरांत गिरवाल अशी कल्पना नव्हती मला.

कुलंगडी–मी नागासारखा वाटतो काय ? ज्यावेळीं उपाशी पोटीं

डोळे पांढरे होण्याचा प्रसंग आला होता त्यावेळीं हाच काका तुझ्या बापाला देवासारखा वाटत होता. आणि आतां–

कल्याणी–काका, तुमच्याशीं जास्त बोलण्याची माझी इच्छा नाहीं. तुम्हीं इथनं जा आणि पुन्हां इथं पाऊल टाकलंत–

बकुळा–तर तंगडी मोडून फोडून टाकीन !

सदानंद–छे ! छे ! बकुळा, तंगडी मोडलीस तरी हा कुलंगडी लंगडी घालीत पुन्हां इथं येईल. त्याचा वेगळाच बंदोबस्त करायला पाहिजे. (कुलंगडीस) काका, आतां बाहेर होतां कीं पोलिसांना बोलवून आणू ?

कुलंवडी– ( आश्चर्यानें चिडून ) पोलीस ! म्हणजे मी चोर आहें काय ?

सदानंद–ट्रेसपासच्या कायद्याखालीं इथनंच बेड्या ठोकून नेईन तुला.

कुलंगडी–बेबी, माझं म्हणणं तर ऐकून घेशील कीं नाहीं ?

सदानंद–बकुळा, आपण या कुलंगड्याला बाहेर काढूं. ( कुलंगडीला धरतो. तो हाताला हिसडा देतो.)

कुलंगडी–ठीक आहे ! बेबी, मला काका कुलंगडी म्हणतात. तुला जन्मातनं नाहीं उठवली!

कल्याणी–(संतापानें ओरडून) काका–

कुलंगडी–(त्वेषानें) अच्छा ! (जातो. सदानंद त्याच्या मागोमाग जातो. क्षणभर शांतता पसरते).

कल्याणी–बकुळा, माझा तर बाई धीर सुटत चाललाय्.

बकुळा–असं म्हणून कसं चालेल ताईसायब ! वंगाळ वखूत सांगून शान येत नसतो. पर तो आला म्हंजे मातुर त्येच्या संगं झगडा कराया व्हीवा मानसानं !

कल्याणी–बकुळा, मीं सिनेमा नटी आहें. माझं आयुष्य हें असंच चालायचं का ग ? बकुळा, त्या दिवशीं तूं तसल्या संकटांत सांपडली होतीस. पण तूं भीति न बाळगतां बेलाशक टक्कर मारलीस ! त्यावेळीं तुझ्या अंगांत

कसल्या तरी दिव्य शक्तीचा संचार झाल्यासारखा मला दिसला. तुझं तें तेज पाहिल्यावर मला माझ्या दुबळेपणाची चांगलीच जाणीव झाली ! बकुळे, मला एक भिक्षा घालशील का ?

**बकुळा**–असं काय भलतंच बोलतां ? किती झालं तरी मी एक गरीब बाई हाय.

**कल्याणी**--तूं गरीब नाहींस बकुळा, तूं माझ्यापेक्षां श्रीमंत आहेस. सगळं जग माझ्या कलेचं कौतुक करतंय्. सिनेमा नटी झाल्यावर मी एवढा पैसा मिळवला. माझ्या वैभवानं जगाचे डोळे दिपले ! पण बकुळा, तुझ्या वैभवानं माझे डोळे दिपले ! त्या तुझ्या वैभवापुढं मी दरिद्री आहें, कपाळ-करंटी आहें. तुझ्या अंत:करणांत सतीत्वाची शक्ती आहे, पावित्र्याचं तेज आहे. यापुढं कुबेराचं भांडारहि कस्पटासारखं आहे. बकुळा, तुझ्या त्या दिव्य तेजाची आणि पावित्र्याची मला गरज आहे. माझं सगळं वैभव घे आणि मला तुझी तेजस्वी शक्ती दे– एवढीच भिक्षा घाल मला !

**बकुळा**–ताईसायेब, असं कांहीं इपरीत बोलूं नका. तुमी लई चांगल्या आहांत, पन तुमच्याकडं येनारी मानसं वंगाळ हैत. त्यामुळं तुमास्नी भ्या वाटतंया.

**कल्याणी**–खरंच मला भीति वाटते ग ! माझ्यावर असा प्रसग कोस-ळला तर कोण धांवून येईल मला सोडायला ? बकुळा, तूं धीराची आहेस नाहीं ग बकुळा ? अगदीं निराधार वाटतंय मला !

**बकुळा**–तुमी देवाची मनोभावानं पूजा करतां, त्यो धावून येईल त्या वक्ताला !

**कल्याणी**–देव्हाऱ्यांतला देव धावत येणार नाहीं. तो तुझ्यासारखीच्या रूपानं धावत येईल. बकुळा, त्यासाठीं तूं मला पाहिजेस. तूं माझ्या हाकेला धावून आलीस–

**बकुळा**–ताईसाहेब, मी आले नसते तर खरंच तुम्हीं उपाशी ऱ्हानार व्हता ?

**कल्याणी**–होय. तूं आल्याशिवाय जेवायचं नाहीं असा मी निर्धार

केला होता'. तूं आज, अगदीं पाठच्या बहिणीच्या प्रेमानं आलीस. आता माझ्या जिवांत जीव आला. (थांबून) बकुळा, मी धोंडीरामाला कामावरनं काढून टाकलंय्.

**बकुळा**–म्हंजे ?

**कल्याणी**–त्याच्यामुळंच तुझ्यावर वाईट प्रसंग आला होता !

**बकुळा**–मग सैपाक कोन करनार ?

**कल्याणी**–आज मला तुझ्या हातचा स्वैंपाक पाहिजे.

**बकुळा**–माझ्यासारख्या मोलकरनीच्या हातचां सैपाक चालंल तुमाला?

**कल्याणी**–चालेल मला ! आज तुझ्या हातचं खायचं ठरवलंय्.

**बकुळा**–मला यायला उशीर व्हईल म्हणून घरीं सांगुनशान येते मी.

**कल्याणी**–ये बरं का. नाहींतर घरींच रहाशील.

**बकुळा**–न्हाई जी. (जाते.)

**कल्याणी**–साध्या भोळ्या बकुळेजवळ केवढं कणखर अंत:करण आहे ! ती पत्नी असल्यामुळं तिच्या मनाला केवढा मोठा आधार वाटतो. असलं सौख्य माझ्या नशिबीं नाहीं का ?

## गाणें

कां भासते मनाला – आशा नुरे जिवाला ।
व्याकूळल्या मनाला – आधार कोण उरला ।। धृ० ।।
अंधारल्या जगीं या – देईल धीर जीवा
स्नेहाळ अंतराचा – नाहीं मना विसावा ।।
संगीत रागिणीला – बेसूर भाव भरला
झंकार भंगला का – आकांत आळवीला ।।
वारा तुफान सुटतां – लाटा विशाल उठतां
नौका फुटून जातां – त्राता कुणी न मजला ।।

(गाणें संपल्यावर दरवाजाजवळची घंटा वाजते. एस्. विश्वनाथ दरवाजांत उभा रहातो.)

**कल्याणी**–कोण आहे ?

**विश्वनाथ**–मी, येऊं का आंत ?

**कल्याणी**–या कीं. (विश्वनाथ येतो, एका खुर्चीवर बसतो.)

**विश्वनाथ**–काय चाललं होतं ? ( टेबलावरचं पुस्तक पाहून ) हें काय ? सुखाचा संसार ? वा: कल्याणी देवी, हा सुखाचा संसार वाचीत होतां वाटतं ?

**कल्याणी**–सध्यां मी जरी संसार करीत नसले तरी असलं पुस्तक वाचायला काय हरकत आहे ?

**विश्वनाथ**–हरकत नाहीं. पण सिनेमा नटी आणि सुखाचा संसार हे शब्द सुखानं कधीच एकत्र नांदत नाहींत.

**कल्याणी**-म्हणजे ? मला संसार करतां येणार नाहीं का ?

**विश्वनाथ**–तुम्ही पुष्कळ संसार कराल हो ! पण तुमचा धंदा तुम्हांला संसार करूं देणार नाहीं.

**कल्याणी**–कां बरं ? नोकरी करणाऱ्या मुली संसार करतात ना ?

**विश्वनाथ**–अहो, सिनेमा म्हणजे घड्याळाप्रमाणं आठ तासाची नोकरी समजतां कीं काय तुम्हीं ? चोवीस तास सिनेमा नटीला तोंडाला रंग चोपडून तयार रहावं लागतं. मग त्यांच्या संसाराचा गुलाबी रंग पार उडून जातो. हें संसाराचं वेड डोक्यातनं काढून टाका बुवा !

**कल्याणी**–कां बरं ? संसार करावा असं मला वाटतं.

**विश्वनाथ**–वाटतं ! पण जरा विचार करा. ज्या नटींनीं लग्न केलींत त्यापैकी कितींचे संसार सुखाचे चाललेत ? आमचा संसार सुखाचा चालला आहे असं हंसून सांगतील त्या तुम्हांला; पण त्यांच्या संसाराच्या फाटक्या वावड्या कोर्टाच्या आवारांत वाऱ्यावर उडालेल्या पहायला मिळ–तात जगाला! म्हणून सांगतों, विशेषत: सिनेमा नटीच्या बाबतींत सिनेमा आणि संसार यांचं विळ्याभोपळ्याचं नातं आहे. बरं, मी आलों होतों, माझ्या कामासाठीं आणि निघाला वेगळाच विषय ! कल्याणीदेवी, हो पाहिलींत वर्तमानपत्रं? ( वर्तमानपत्रांचा जुडगा टेबलावर ठेवतो. )पहा, सगळ्या वर्तमानपत्रांतून दमयंती चित्रपटाच्या जाहिराती फडकायला लागल्या अहोत.

**कल्याणी**–(वर्तमानपत्रें पहात) खरंच कीं ! अहो, पण अजून निम्मासुद्धां चित्रपट पुरा झाला नाहीं आणि–

**विश्वनाथ**–हें आमचं ट्रेड सीक्रेट आहे. एकावन्न थिएटरांत पिक्चर लावण्यासाठीं सर्व तरतूद करून ठेवलीय बापूसाहेबांनी. कल्याणीदेवी, हा चित्रपट अमेरिकेला नेण्याचा माझा विचार आहे.

**कल्याणी**–तुमचा विचार चांगला आहे. पण माझा विचार निराळा आहे.

**विश्वनाथ**–काय म्हणतां ?

**कल्याणी**–सिनेमांत काम न करण्याचा.

**विश्वनाथ**–म्हणजे ? काय, म्हणताय काय तुम्हीं ?

**कल्याणी**–तो काका कुलंगडी जोंपर्यंत तुमचा कॅमेरामन आहे तोंपर्यंत मी काम करणार नाहीं.

**विश्वनाथ**–(हंसून) असं ! असं ! आलं लक्षांत.

**कल्याणी**–काका इथं येऊन गेले.

**विश्वनाथ**–(संतापून) हरामखोर ! इतकं त्याला मी खडसावून सांगितलं तरी तो आपल्या वळणावर गेलाच. लग्नाच्याचा बायकोवर हात टाकायचा म्हणजे काय गोष्ट आहे ? मी त्याला कामावरनं काढून टाकलंय् असं समजा. पुन्हां त्यानं स्टूडियोत पाऊल टाकलं तर पेकाटांत लाथ मारून त्याला बाहेर काढीन. कल्याणी, काकासारखे, कॅमेरामन लाख मिळतील, पण तुमच्यासारखी स्वरूपसुंदर दमयंती एकच मिळेल. तुम्हीं त्याच्याबद्दल मनांत कसलाही विकल्प आणूं नका. मग तुमचं काय म्हणणं आहे ?

**कल्याणी**–काका नसतील तर मी काम करीन.

**विश्वनाथ**–आतां माझ्या मनाला बरं वाटलं! (थांबून) कल्याणीदेवी, मी आज एक निसर्गरम्य जागा पाहून आलोंय्. अहाहा ! किती रमणीय ! किती मनोहर ? किती सुंदर ! मी तर देहभानच विसरून गेलों.

**कल्याणी**–मलासुद्धां निसर्गाचा सहवास आवडतो. चंद्राच्या शीतल चांदण्यांत मी स्वतःला विसरून जाते. सगळ्या पृथ्वीवर सोन्याचा पाऊस

पाडणारं तें चांदणं, तो जाईजुईचा हवेंत दरवळणारा मंद सुवास, चंद्र-प्रकाशांत देवपुरुषाप्रमाणं दिसणारीं तीं झाडं पाहिलीं कीं माझं मन वेडं होतं. तो आनंद लुटण्यासाठीं मी कुठंतरी जाऊन बसतें.

**विश्वनाथ**–तुमचं बोलणं ऐकत असतांना याचवेळीं सर्वत्र चांदणं पसरल्याचा मला भास झाला. पण कल्याणी, असलं सौख्य एकटेपणानंच उपभोगलं तर त्यांत अपुरेपणा वाटतो. नाहीं का ?

**कल्याणी**–कसला अपुरेपणा ?

**विश्वनाथ**–एकटा माणूस अपुरा असतो. असला एकलेपणा मनाला, एकसारखा बोचत असतो.

**कल्याणी**–अगदीं माझ्या मनांतलं बोललांत. एकदां मी अशीच चांदण्यांत बसले होतें. सगळीकडं कसं शांत शांत होतं. त्यावेळीं मला वाटलं–मला वाटलं !

**विश्वनाथ**–(हलकेच तिच्याजवळ बसत) काय वाटलं ? कल्याणी, काय वाटलं तुला ?

**कल्याणी**–कुणीतरी माझ्याजवळ असावं-तें माणूस माझं–सर्वस्वीं माझं असावं– त्याच्या अंतःकरणावर माझं अंतःकरण विसावलेलं असावं– माझं मीपण त्याच्याशीं एकरूप होऊन जावं–तो सात्विक आनंद माझ्या आयुष्यांत एकदां तरी यावा !

**विश्वनाथ**–याच भावनेवर जग जगत असतं– याच मीलनासाठीं सगळं विश्व आतुर झालेलं असतं. कल्याणी, तुम्हीं मनांत आणलं तर त्या स्वर्गीय सुखाला मी इथंच खेचून आणीन. कल्याणी–इथं–या घटकेला!

**कल्याणी**–या घटकेला ? इथं ? तें कसं ?

**विश्वनाथ**–( तिचा हात आपल्या हातांत घेण्याचा प्रयत्न करीत ) हें असं !

**कल्याणी**–(ताडकन् उठून) डायरेक्टर ? काय करतां हें ?

**विश्वनाथ**–स्वर्गाला हात लावतोंय्. ( तिचा हात धरण्यासाठीं पुढें होतो )

**कल्याणी**–शुद्धीवर आहांत का तुम्हीं ?

**विश्वनाथ**–सुखाच्या वेळीं माणूस शुद्धीवर कधीं असतो का ? कल्याणी, फुलं वासासाठीं आणि स्त्री सहवासासाठीं असते. कल्याणी, पुरुषाच्या अंतःकरणांत भडकलेल्या आगीच्या ज्वाला त्याच्या हातांतून बाहेर पडतात. घराला लागलेली आग पाणी ओतून विझवतां येते. पण हृदयाला लागलेली आग आहुती घेतल्याशिवाय विझत नाहीं.

**कल्याणी**–विश्वनाथ, तुमचं हें वागणं मला मुळींच सहन होणार नाहीं ! मी अजून निष्कलंक आहें. असला स्पर्श मला कधींही झालेला नव्हता. माझ्या शीलाची अजून विटंबना झालेली नाहीं !

**विश्वनाथ**–कशाला शीलाचा एवढा टेंभा मिरवतेस ? चल, अशीच तुला फराफरा ओढीत मी रस्त्यावर नेतों. मी निष्कलंक आहें असं तूं जगाला ओरडून सांग. घसा फुटून जाईल तुझा. पण तुझ्या शब्दावर कुणीही विश्वास ठेवणार नाहीं. कल्याणी, तूं नटी आहेस. सिनेमा नटी म्हणजे काय चीज आहे हें सर्वांना माहीत आहे. वाच–वाच या सिनेमाच्या जाहिराती! वाच तुझ्या सौंदर्याची हीं रंगेल वर्णनं आणि सांग मला, तुला कोण शीलवती म्हणतो तें ! तूं स्वतः पवित्र असशील, निष्कलंक असशील पण कुणीही तुझ्या सांगण्याला किंमत देणार नाहीं. कल्याणी, तुझ्या शीलाची जाहिरात या सिनेमाच्या जाहिरातीपेक्षां जास्त झालेली आहे समजलीस !

**कल्याणी**–चांडाळा, चालता हो इथनं–

**विश्वनाथ**–आणि नाहीं गेलो तर ?

**कल्याणी**–चालता होतोस कीं नाहीं ? नाहींतर–( फ्लॉवर पॉट उगारते )

**विश्वनाथ**–( तडफेनें तिच्या हातांतलें फ्लॉवर पॉट काढून घेतो व स्टँडवर ठेवतो.) विनाकारण फुटून जाईल तें. यापेक्षां जास्त कांहीं होणार नाहीं. स्त्रीच्या अब्रूसारखं आहे तें !

**कल्याणी**–हलकट माणसा, मला एकटीला गांठून तूं पापानं हात

काळे करतोस? जा म्हणतेना !

**विश्वनाथ**–आतां कसा मी मुकाट्यानं जाईन ? –

**बकुळा**–( प्रवेशून ) न्हाई गेलास तर नारळावानी टकूरं फोडून भकलं करीन बग. ( कल्याणीला पाठीशीं घालून उभी रहाते. ) दुसऱ्याच्या बायाबापड्या म्हंजे काय समजलास रं तूं ? भुताच्या नावानं रस्त्यावर टाकलेला उतारा हाय व्हय? गुमान जा हतनं; न्हाईतर–(सदानंद प्रवेशतो.)

**सदानंद**–( आश्चर्यानें ) काय झालं ग बकुळा ?

**बकुळा**–काय व्हयचंय् ? कसाब आपली करनी दावीत व्हता.

**सदानंद**–(संतापून ) डायरेक्टर, काय प्रकार आहे हा ?

**विश्वनाथ**–( शांतपणें ) कल्याणी, थोडक्यांत बचावलीस. पण उद्यां तुला माझ्यासमोर नाचावं लागेल.

**कल्याणी**–मी काम करणार नाहीं. आपला करार मोडला म्हणून समजा.

**विश्वनाथ**–समजा ! या गमजा नाहीं चालायच्या. कायदेशीर करार मोडल्याबद्दल नुकसान भरपाई करावी लागेल. कदाचित् बंगला विकूनसुद्धां.

**कल्याणी**–अगोदर तूं आपलं तोंड इथनं काळं कर.

**विश्वनाथ**–हेंच काळं तोंड तुला पुन्हां पहावं लागेल. कसा करार मोडतेस ते बघतों. ( त्वेषानें निघून जातो. )

**कल्याणी**- (दुःखानं) बकुळा, आतां काय करूं ग मी !

**बकुळा**–काय ह्ये आकरीत आलं तुमच्यावर !

**कल्याणी**–बकुळा, माझं मन अगदीं गांगरून गेलंय् ग ! आतापर्यंत माझ्यावर असलं संकट कोसळलं नव्हतं ! पण आज–आज माझ्या जिवाचा थरकांप उडालाय्. बकुळा, पाठच्या बहिणीसारखी तूं धावली नसतीस तर–नाहीं–मला पुढची कल्पनाच सहन होत नाहीं. माझं मस्तक फुटून जाईल कीं काय असं वाटतंय मला !

**सदानंद**–तुम्ही थोड्या स्वस्थ रहा. असं घाबरून कसं चालेल !

**कल्याणी**-आतां माझ्या मनाला कुठली स्वस्थता ? त्या विश्वनाथानं

नाहीं नाहीं तें विष माझ्या कानांत ओतलं, त्यामुळं माझ्या काळजाचे अगदीं तुकडे तुकडे उडाले. त्या विषानं माझ्या जीवनाचं स्वप्न पार काळवंडून गेलं. बकुळा, सदानंद, तुम्हीं जा इथून. मला एकटीलाच थोडा वेळ बसूं दे. ( बकुळा सदानंद जातात. वादळाचें पार्श्वसंगीत चालूं होतें. ) मी मनानं इतकी पवित्र राहिले देहानं इतकी निष्कलंक राहिले तरी माझ्यावर कुणीहि विश्वास ठेवणार नाहीं ? कुणालाहि खरं वाटणार नाहीं ? असं कां ( पडद्यांतून–कारण तूं नटी आहेस ) होय, मी नटी आहें ! नाइलाजानं मी नटी झालें. तरीपण माझं शील मी गमावलं नाहीं. हे मीं सगळ्यानां जगाला ओरडून सांगितलं तरी पटणार कुणालाही नाहीं – ( पडद्यांतून-कारण तूं नटी आहेस ) नाहीं–नाहीं नटी नाहीं. मी चांगल्या कुळांतली मुलगी आहें. मला माझ्या घराण्याचा मोठेपणा धुळीला मिळवायचा नाहीं! मला माझं पवित्र्य नष्ट करायचं नाहीं! मी नटी नाहीं–आई !

(पडद्यांतला आवाज)–आतां असा आक्रोश करून काय फायदा? उपाशी पोटी तडफडावं लागलं म्हणून तूं नटी झालीस! त्यामुळं तुला पैसा मिळाला, कीर्ति मिळाली आणि आतां मी नटी नाहीं असं कां म्हणतेस ? तुझ्या असल्या बडबडीवर कोण विश्वास ठेवील ? पैशापुढं सगळ्या गोष्टी फोल आहेत. तूं संपत्ति मिळवलीस आतां कां अशी तडफडतेस ?

कल्याणी–आई–आई; मला संपत्ति नको, मला कीर्ति नको–मला गरिबी पाहिजे–आई मला गरिबी पाहिजे !

(पडद्यांतला आवाज)–कल्याणी, कुबेरानं संपत्तीची रास ओतली तरी शीलवती स्त्री त्यावर लाथ मारते. आयुष्याची आहुती द्यावी लागली तरी चालेल पण शीलाचं रक्षण झालं पाहिजे. पुन्हां तूं दरिद्री झालीस तरी चालेल पण तूं शीलभ्रष्ट होऊ नकोस. शीलभ्रष्ट स्त्री म्हणजे मूर्तिमंत मरण आहे, मरण–कल्याणी शील संभाळ !

कल्याणी–माझं शील मी कसं संभाळूं ? नरपशूंनीं चोहींकडून घेरल्यावर माझा कसा टिकाव लागणार ? सगळं जग माझ्याकडं वखवख-लेल्या नजरेनं पहातंय्. सगळ्यांना माझ्या सौंदर्याची तहान लागली आहे. त्या डायरेक्टरला– !

( **पडद्यांतला आवाज**)– तुझ्या शीलाचा बळी घ्यायचा आहे.

**कल्याणी**–त्या कुलंगडीला–

**आवाज**(पडद्यांतला)–तुझ्या सौंदर्याचं फूल कुस्करून टाकायचं आहे. (हास्य)

**कल्याणी**–सगळ्या लोकांना -

**आवाज़**–(पडद्यांतला) तुझं तारुण्य मातींत मिसळून टाकायचं आहे. (हास्याचा कल्लोळ)

**कल्याणी**–त्या सदानंदाला -

**सदानंद**-(प्रवेशून) नाहीं. माझी तशी भावना नाहीं.

**कल्याणी**–(जाग आल्याप्रमाणें) अं ! काय म्हणालास ?

**सदानंद**–माझी तशी दृष्टी नाहीं. कावेरी !

**कल्याणी**–(चमकून) कावेरी ! कुणी मला कावेरी म्हटलं ?

**सदानंद**–कावेरी, लोक तुला कल्याणी म्हणून ओळखतात. मी तुला कावेरी म्हणून ओळखतों.

**कल्याणी**–माझं हें नांव कुणालाच माहीत नव्हतं आणि !

**सदानंद**–तें मला कसं माहीत झालं? कावेरी, काळाचा पडदा हलक्या हातांनीं बाजूला करण्याचा प्रसंग येतो माणसावर ! नशिबानं दाखविलेल्या रस्त्यानं तूं या बंगल्यात आलीस आणि त्याच दैवानं मला इथं नोकर म्हणून आणलं. आतांपर्यंत लपवून ठेवलेलं सत्य नाइलाजानं बाहेर पडलं.

**कल्याणी**–अजून माझ्या लक्षांत येत नाहीं.

**सदानंद**–तूं पांच सहा वर्षांची होतीस. त्यावेळीं तुझ्या शेजारीं गोविंदराव सातपुते नांवाचे गृहस्थ रहात होते. घरच्या गरिबीमुळें त्यांचा एकुलता एक मुलगा वार लावून शिकत होता.

**कल्याणी**–(आश्चर्यानें) म्हणजे तोच तूं सदानंद ?

**सदानंद**-तोच मी. शिक्षणाच्या महत्त्वाकांक्षेनं मी कॉलेजमध्यें गेलों. वार सुटले आणि शिकवण्या करूं लागलों. त्याच वेळीं सिनेमासृष्टीनें माझें अंतःकरण वेधून घेतलें. माझं शिक्षण पूर्ण झालं त्याच सुमारास वडील

वारले आणि मला कसलाच पाश न उरल्यामुळें मी या जगांत प्रवेश केला. चित्रपट सृष्टींत कांहींतरी करून दाखवावं म्हणून मोठी उमेद होती मला. पण–

**कल्याणी**–म्हणजे सिनेमांत तूं काम करीत होतास तर? काय करीत होतास?

**सदानंद**–तो एक वाईट इतिहास आहे. सिनेमा कंपनींतल्या इतर लोकांमध्यें वावरतांना माझा प्रामाणिकपणा नडला मला. त्या लोकांनीं पद्धशीरपणें मला त्या जगांतून बाहेर काढलं.

**कल्याणी**–मी तुला ओळखलंच नाहीं. त्यावेळचा तूं सदा, किती वर्षांनीं भेटलास! आणि माझ्या घरीं नोकर म्हणून!

**सदानंद**–कावेरी, क्षणोक्षणीं पाऊल घसरेल कीं काय अशी भीती असताहि या पेशात असतांना तूं मात्र अद्याप पावेतों आपलं पावित्र्य काळजीपूर्वक सुरक्षित ठेवलंस! इथं आल्यापासून मी तुझ्या वर्तनाचं बारकाईनं निरीक्षण करीत होतों. इतर नटींप्रमाणें तूं वाहवली नाहींस, हें पाहून आनंद वाटला मला.

(दारावर घंटा वाजते)

**कल्याणी**-कोण आलंय् बघ पाहूं–

**सदानंद**–(बाहेर पाहून) बापूसाहेब आणि डायरेक्टर आलेत.

**कल्याणी**–अगबाई आतां रे सदानंद?

**सदानंद**–तुम्हीं घाबरूं नका. ( बापूसाहेब व डायरेक्टर प्रवेश करतात.) या बापूसाहेब.

**कल्याणी**–डायरेक्टर, तुम्हीं पुन्हां कशाला आलांत इथं?

**बापूसाहेब**–त्यांना मीच आणलं इथं. कल्याणी देवी, तुम्हीं दमयंती चित्रपटांत काम करणार नाहीं म्हणून म्हणालांत असं या डायरेक्टरनं सांगितलं. त्यासाठीं मी मुद्दामच चौकशी करायला आलों.

**कल्याणी**–चांगलं केलंत! बापूसाहेब, मला सिनेमांत काम करायचं नाहीं.

**विश्वनाथ**–आतां तुम्हींच ऐका बापूसाहेब. झाली तुमची खातरी ?

**बापूसाहेब**–तुम्हीं आपली खातरी करून घ्या डायरेक्टरसाहेब. कारण तुम्हीं दमयंतीचे डायरेक्टर आहांत !

**विश्वनाथ**–पण आपला करार झालेला आहे. तो मोडतोय्. आणि असा चित्रपट अर्धवट पडला तर आतांपर्यंत तुमचा खर्च झालेला पैसा कसा वसूल होणार ? शिवाय माझं नुकसान होईल ते वेगळंच ! पुन्हां मला डायरेक्शन मिळणार नाहीं. अशानं माझं नांव खराब होईल.

**बापूसाहेब**–ठीक आहे. कल्याणीदेवी, तुम्हीं काम नाकारण्याचं कारण काय ?

**कल्याणी**–ते या डायरेक्टरनांच विचारा.

**सदानंद**–हा माणूस तुमच्याबरोबर आला म्हणून धडपणानं इथं बसलाय. बापूसाहेब, तुम्हीं इथं नसतां तर या हरामखोर माणसाला–

**विश्वनाथ**–(ओरडून) सदानंद, तोंड आवरून बोल–

**बापूसाहेब**–हां ! हां ! असे वर्दळीवर येऊं नका. डायरेक्टर, तुम्हीं इथं कांहीं वेडावांकडा प्रकार तर केला नाहीं ना ?

**विश्वनाथ**-बापूसाहेब, माझ्या खाजगी बाबतींत तुम्हीं चौकशी करूं नये.

**बापूसाहेब**–चौकशी कशाला म्हणतां डायरेक्टर, चांभारचौकशी म्हणा. नुसत्या वाढलेल्या वयानं माझे काळे केस पांढरे झालेले नाहींत. प्रत्येक वर्षाबरोबर जगाचे कांहीं अनुभव मी गांठीला बांधले आहेत. असो. आपण व्यवहारापुरतं बोलूं. कल्याणीदेवी काम करणार नाहींत. म्हणजे त्या आपला करार मोडीत आहेत.

**विश्वनाथ**–अर्थात्. आणि त्याबद्दल नुकसानभरपाई करून घेतली पाहिजे. बापूसाहेब, आपला दमयंती चित्रपट चांगला व्हावा म्हणून तुम्हीं पाण्यासारखा पैसा खर्च केलात. हा करार मोडल्यामुळं आतांपर्यंत खर्च झालेला पैसा पाण्यांत गेला. अहो सत्तर हजार रुपये खर्च झालेत !

**बापूसाहेब**–म्हणजे या सत्तर हजारांची भरपाई आपल्याला मिळाली पाहिजे.

**विश्वनाथ**–अलबत्. आतां मला दुसरी एकादी नटी शोधली पाहिजे. त्याशिवाय चित्रपट पुरा होणार नाहीं.

**बापूसाहेब**–दुसरी नटी घेऊन तुम्हीं चित्रपट काढणार आणि त्यासाठीं माझा पैसा तुम्हांला पाहिजे, नाहीं का ?

**विश्वनाथ**–(अजीजीनें) तुम्हीं तर माझे फायनान्सर आहांत.

**बापूसाहेब**–खर्च झालेल्या रकमेची भरपाई मी कल्याणीदेवींकडून करून घेईन. डायरेक्टरसाहेब. कल्याणींदेवी काम करीत असतील तरच मी भांडवल देईन अशी माझी मुख्य अट होती. तेव्हां तुमच्या पुढच्या सिनेमासाठीं पैसा पुरविण्याची जबाबदारी माझ्यावर नाहीं.

**विश्वनाथ**–(चिडून) अस्सं ! म्हणजे माझा अंदाज खरा ठरणार तर !

**बापूसाहेब**–तुमचे सगळे अंदाज मी जाणून आहे. कल्याणींदेवी तुम्ही काम करणार नाहीं ना ?

**कल्याणी**–एकदां सांगितलं तेंच पुन्हां सांगतें. विश्वनाथच्या डायरेक्शनखालीं मी मुळींच काम करणार नाहीं.

**बापूसाहेब**–झालं तर. डायरेक्टर, काम संपलं तुमचं ! तुमचा रस्ता तुम्हांला मोकळा झालाय्.

**विश्वनाथ**–मोकळ्या रस्त्यानं मोकळ्या हातांनीं जायला मी मूर्ख नाहीं. बापूसाहेब, भांडवल देण्याचं आश्वासन देऊन माझा तुम्हीं विश्वासघात केलात म्हणून–

**बापूसाहेब**–तुम्हीं माझ्यावर फिर्याद कराल. तोही रस्ता मी तुमच्यासाठीं मोकळा करून ठेवतों. पण ध्यानांत ठेवा, चित्रपट पुरा न केल्याबद्दल, आणि मी विश्वासानं तुम्हांला दिलेल्या पैशाचा अपहार केल्याबद्दल मीच तुम्हांला तुरुंगांत खेचीन, समजलांत ?

**विश्वनाथ**–भ्रम आहे तुमचा !

**बापूसाहेब**–चुकतांहांत तुम्हीं. तुम्हांला दिलेल्या पैशाचा कसा खर्च होतो त्यावर माझं काटेकोर लक्ष होतं. ते निर्जीव आंकडे तुमचं पाप ओरडून सांगतांहेत. ती फसवाफसवी मला माहीत नाहीं असं वाटतं काय तुम्हांला ?

**सदानंद**–बापूसाहेब, दमयंतीचं कथानकसुद्धां त्यांचं नाहीं. डायरेक्टर एस् विश्वनाथ, विक्रम फिल्म कंपनीत तुम्हीं काम करीत होतां तेव्हां तेथून तुम्हीं हें कथानकाचं चोपडं चोरलंत आणि तेच तुम्ही आपल्या नांवावर खपवीत आहांत.

**विश्वनाथ**–खोटं आहे हें !

**सदानंद**–तें चोपडं सदानंद सातपुते नांवाच्या माणसानं तिथं आणलं होतं.

**विश्वनाथ**(आश्चर्यानें) म्हणजे तो सदानंद सातपुते–

**सदानंद**–मीच. बापूसाहेब, डायरेक्टरच्या खोटेपणाचा हा घ्या एक पुरावा.

**बापूसाहेब**–डायरेक्टरसाहेब, मी तुम्हांला ओळखलं नाहीं असं कां वाटतं तुम्हांला ? तुम्ही माझी कशी निंदानालस्ती करीत होता याची मला चांगलीच कल्पना होती. या कल्याणीदेवीचे आणि माझे घाणेरडे संबंध जोडून तुम्हीं कसल्या अफवा पसरवीत होतां हें सगळं मला माहीत आहे. तुमच्यासारखे निमकहराम लोक जोपर्यंत चित्रपट सृष्टींत वावरतोहत तोंपर्यंत चित्रपट सृष्टीला ऊर्जितावस्था यावयाची नाहीं हें पक्कं लक्षांत ठेवा. परंतु कांहीं कारणामुळं मी या सगळ्या गोष्टीकडं कानाडोळा करीत होतो. माझे आतांपर्यंत खर्च झालेले पैसे बुडले तरी चालतील. पण मला तुमचं तोंड पहायचं नाही.

**सदानंद**–म्हणजे विश्वनाथ, तुम्हीं गेलांत तरी चालेल. कीं मघाशीं अर्धवट राहिलेला सीन मी इथंच पुरा करूं ?

**विश्वनाथ**–बापूसाहेब, हा अन्याय होतोय माझ्यावर !

**सदानंद**–आतां तुला न्याय–अन्याय सुचला काय ? ताईसाहेब, तुम्हीं मला परवानगी द्या म्हणजे मी याची रवानगी करतों.

**विश्वनाथ**–एवढी नको तसदी घ्यायला. मीच जातों. पण ध्यानांत ठेवा, या कल्याणीला पुन्हां सिनेमांत कुठंही काम मिळणार नाहीं असा मी बंदोबस्त करीन. (जातो)

**बापू**–बरं झालं; एका दुष्ट माणसाचा सहवास संपला.

कल्याणी–हंऽ ! (थांबून) बापूसाहेब, तुम्हीं त्यांना माझ्या कामाची अट घातली होती, ती कांम्हणून ?

बापू–हरपलेलं भावनेचं समाधान परत मिळविण्याचा तो एक मार्ग होता. कल्याणी देवी, मी दिलेलं पातळ नेसून त्या दिवशीं तुम्हीं आलांत आणि–जें पहाण्यासाठीं माझे डोळे अधीर झाले होते त्यानां तृप्ती मिळाली. कल्याणी देवी, म्हातारा झालोंय् मीं आतां, माझ्या अंतःकरणाला जगाबाहेरचे वेध लागले आहेत. पण माणसाचं मन कसल्या तरी आशेभोंवती घोटाळत असतं ! त्याच आशेनं मी तुमच्याकडे आलों होता.

कल्याणी–मी तुम्हांला कसलाहि दोष देत नाहीं, पण मला अजून कांहींच उलगडा होत नाहीं.

बापू–तो उलगडा होऊं नये असंच मला वाटतं. पण तुमच्या मनांतला संशय दूर व्हायचा नाहीं, म्हणून सांगतों. यंत्रामध्यें सापंडलेला कामगाराचा मुलगा कुणी वांचवला हें माहीत आहे तुम्हांला ? तो मुलगा मरणाकडे खेचला जात होता. तो भयंकर प्रकार पाहून मुलाचा बाप किंकाळी फोडून बेशूद्ध पडला. तिथंच त्यावेळीं माझी मुलगी उभी होती. विजेच्या वेगानं तिनं त्या मुलाला मरणाच्या दाढेंतून मागें खेचलं पण–पण तिचे कपडे त्या यंत्रांत ओढले गेले आणि बघतां–बघतां–तिचे तुकडे पहाण्याचा माझ्यावर प्रसंग ओढवला. कल्याणी देवी, रक्ताच्या थारोळ्यांत पडलेले तिचे तुकडे मी या डोळ्यांनीं बघितले. माझं रक्त गोठल्यासारखं झालं. माझी मुलगी माझ्या डोळ्यांदेखत पांखरासारखी भुरकन उडून गेली. काय झालं हें समजण्यापूर्वींच सगळं संपलं होतं. कल्याणीदेवी ती मुलगी अगदीं तुमच्यासारखी दिसत असे. आणि तिचंही नांव कल्याणीच होतं ! माझी हरवलेली बाळ तुमच्या रूपानं मला पुन्हां पहायला मिळाली. तुमच्या सहवासांत माझ्या दुखावलेल्या मनाला विरंगुळा मिळाला. कल्याणी–

कल्याणी–(भारावून) बापू !

बापूसाहेब–पुन्हां अशीच हांक मार !

कल्याणी–बापू !

बापूसाहेब–बाळ, माझ्या या सुखाला तूं अंतर देऊं नकोस. (क्षणभरानें) सदानंद, असा पुढें ये. माणसासारखीं माणसं दिसतात कधीं कधीं,

असं तूं म्हणाला होतास, नाहीं का? पण तुझ्या बाबतींत मात्र तसं नाहीं बरं का! तुझे वडील गोविंदराव कांहीं दिवस माझ्या गिरणींत काम करीत होते. त्यावेळीं तूं कॉलेजांत शिकत होतास. सुटीच्या दिवसांत तूं घरीं परत येत होतास त्यावेळीं मी तुला त्यांच्याबरोबर एक दोन वेळां पाहिलं होतं. म्हणूनच तुला मी विचारलं होतं. तुझी योग्यता मी जाणतों. पुढं काय करण्याचा विचार आहे तुझा?

**सदानंद**–तसं कांहीं अजून ठरलेलं नाहीं.

**बापूसाहेब**–ठरलं नाहीं ना? मग मी सांगतों तुला. सिनेमाच्या धंद्यांतली तुला कांहीं कल्पना आहे का?

**कल्याणी**–यानं तर त्याचा चांगलाच अभ्यास केलेला आहे.

**बापूसाहेब**–तूं हा चित्रपट पुरा करण्याचं मनावर घे. कल्याणी, त्यांत काम करील.

**कल्यानी**–मला आतां सिनेमांत काम करायचं नाहीं. संसारी जीवनासाठीं माझं मन आसावलेलं आहे.

**बापूसाहेब**–एवढंच ना? तुला संसारच करायचा असला तर मी तुझं लग्न लावून देतों. सदानंद, या माझ्या मानलेल्या मुलीशीं तूं लग्न कर आणि हा चित्रपट पुरा कर!

**सदानंद**–तुमचे आशीर्वाद माझ्या पाठीशीं उभे असल्यावर मला कसलीहि कमतरता नाहीं.

**बकुळा**–( प्रवेशून ) स्वयंपाक तयार झालाय्. पानं वाढायचीं का?

**धोंडीराम**–( धांवत प्रवेशून ) ताईसाहेब, मला क्षमा करा! क्षमा करा! नको मला तो सिनेमा! मी आचारीच होतों तो बरा होतों. तो कुलंगडी भलतींच कामं सांगायला लागला मला. त्यापेक्षां मी आचाऱ्याचा वाढपी होईन–वाढप्याचा पाणक्या होईन; पण तो सिनेमा नको! ताईसाहेब, मला क्षमा करा!

**बापूसाहेब**–( हंसून ) ठीक, ठीक! स्वयंपाक तयार झालाय, तूं पानं वाढ बघूं झटपट.



**समाप्त**

# मानव्य-प्रकाशनें

## प्रकाशित

१ **जीवन-संयोग**— ले. श्री. वामन राधाकृष्ण B. A.
( कामशास्त्रावरील अद्यावत् माहितीचा सचित्र ग्रंथ ) किं. रु. ५

२ **कालगति**— ( कथासंग्रह ) ले. ' अकिंचन ' किं. रु. १॥

३ **कोडीं कशीं सोडवावीं?**— (४ थी आवृत्ती) ले. 'अकिंचन' किं रु. २

४ **नटीचा बंगला**— ले. श्री. विनायक देवरुखकर. (सिनेमा नटीच्या जीवनावर आधारलेलें नाविन्यपूर्ण सामाजिक नाटक ) किं. रु. १॥

## आगामी

१ **सत्यंकाकूंच्या सत्यकथा**— ( विनोदी कथा-संग्रह )
ले. वि. वि. बोकील किं. रु. ३

२ **गुलाब आणि मोगरे**— ( कथासंग्रह )
ले. वसंत शा. वैद्य किं. रु. २

३ **झेलम-वारा**— ( प्रणयरम्य कादंबरी )
ले. द. ए. सुगांवकर किं. रु. २

४ **' मी हा असा आहें '**— (विनोदी आत्मचरित्रपर कादंबरी)
ले. ह. वि. वाडेकर किं. रु. २

५ **( विनोदी लेखसंग्रह )**
ले. श्रीकृष्ण हवालदार किं. रु. २

---

टीप— वरील पांचहि पुस्तकें डिसेंबर १९५५ मध्यें प्रसिद्ध होतील. )

**व्यवस्थापकः—मानव्य प्रकाशन, टिळक रोड, पुणे २.**